# परक्याचें धन

[ चार अंकी सामाजिक नाटक ]

लेखक
गोविन्द केशव भट

कॉन्टिनेन्टल् प्रकाशन, टिळक रोड, पुणें २.

प्रकाशक :

**अ. अं. कुलकर्णी**

कॉन्टिनेन्टल् प्रकाशन,

१९६।१९ टिळक रोड, पुणें २.

*किंमत दीड रुपया*

प्रथमावृत्ति, ऑक्टोबर १९५४



मुद्रक :

**ह. म. गद्रे**

जनवाणी प्रिंटिंग प्रेस,

४५ बुधवार पेठ, पुणें २.

माझ्या पुतण्या

चि. कु. **नलिनी, कला, ज्योत्स्ना, माया**

आणि

माझी कन्या

चि. कु. **मनीषा**

या पंचकन्यांना

# परक्याचें धन

## अंक १ ते ४

पात्रें :

प्रवेशाच्या अनुक्रमानें

*सुलभा*

*वसंत*

*सुमति*

*शामराव*

*सुधीर*

*पंडित*

दुकानचा माणूस, गडी

*जमना*

*विष्णुपंत*

*परशुरामपंत*

एक गृहस्थ

पोलिस

सर्व घटना सुमारें ९-१० दिवसांत घडून येते अशी कल्पना केली आहे.

**स्थल :** एका उपनगरांतील शामरावांचा फ्लॅट.

**काल :** सध्यांचा.

या नाटकांतील सर्व पात्रें संपूर्णपणें कल्पित असून, त्यांचा कोणत्याहि जिवंत वा दिवंगत व्यक्तींशीं सुतराम् संबंध नाहीं.

# प र क्या चें ध न

*"अर्थो हि कन्या परकीय एव।"*

—( शाकुंतल, ४-२२ )

# १

[ मुंबईसारख्या मोठ्या शहरांतील दादरसारखे उपनगर. एका बंगल्यातील, पहिल्या मजल्यावरील, शामरावाचा तीन खोल्यांचा फ्लॅट. त्यांतील उठण्या-बसण्याची मुख्य खोलीच आपल्याला दिसू शकते. समोरच्या भिंतीत, आपल्या डाव्या हाताकडे, बाहेरून आत येण्याचे प्रवेश-द्वार आहे. हें दार उघडें असले म्हणजे समोरील जिन्याची तबकडी व खालपासून वरपर्यंत गेलेला जिन्याचा कठडा दिसू शकतो. खालून वर येण्याचा जिना भिंतीच्या आड अदृश्य आहे, परंतु प्रवेश-द्वाराच्या डाव्या अंगास एक गजाची खिडकी आहे तिच्यातून, वर गेलेल्या जिन्याचा कठडा व जिन्यावरील ये-जा दिसू शकतील. डाव्या हाताकडील काटकोनांत असणाऱ्या भिंतीत आणखी एक दरवाजा आहे. येथून सैपाकघर व झोंपण्याची खोली यांकडे जातां येतें. या भिंतीशी एक छोटे टेबल असून त्यावर शिवण्या विणण्याचें साहित्य आहे. उजवीकडील काटकोनांत असणाऱ्या भिंतीत एक मोठी उघडी खिडकी आहे. या खिडकीजवळ लिहिण्याचे टेबल व खुर्ची आहे. टेबलावर सुरेखसें टेबल-क्लॉथ, टेबल-लॅम्प, एक दोन पुस्तकें, ऑफिसांत असतो तसा टांक दौतीचा स्टॅन्ड इत्यादि वस्तु आहेत. टेबलाशी बसून लिहिणाराचें तोंड खिडकीकडे होतें, त्यामुळें त्याची पाठ दाराकडे असते हें उघड आहे. याच भिंतीशी पलीकडील कोपऱ्यात, मोठा आरसा असलेली एक आलमारी आहे ही सैपाकघराच्या दारासमोर आहे; त्यामुळें आरशासमोर उभे असणाऱ्याला सैपाकघराच्या दाराशी उभे असणाऱ्याचें प्रतिबिंब दिसू शकतें. समोरच्या भिंतीशीं, प्रवेशद्वाराच्या जवळ, हॅट-स्टॅन्ड आहे. त्याच्या एका खुंटीवर सन हॅट आहे व दुसऱ्या एका खुंटीवरून बरेचसे टाईज लोंबत आहेत. खालीं दोन बायकी छत्र्या उभ्या टेकवून ठेवलेल्या आहेत. स्टॅन्डच्या खालच्या फळीवर वरीवरीं पादत्राणें आहेत. खोलीच्या मध्यभागीं एक छोटें वाटोळें टीपॉय आहे. भोंवतीं सोफा-सेट आहे. याखेरीज एक-दोन खुर्च्या कुठे तरी ठेवलेल्या आहेत. भिंतीवर एका स्त्रीच्या फोटोशिवाय, एकदोन कॅलेन्डराशिवाय बाकी कांहीं नाहीं. सर्व टेबलावर सुरेख, विणलेले लहान-मोठे रुमाल पसरलेले आहेत. वास्तविक खोली मोठी असूनहि आंतील सामानामुळें लहान वाटते.

सध्याकाळची वेळ. बाहेरील दारानें सुलभा आंत येते. वय सुमारें २१-२२. उंच, सड-सडीत, लांब सडक केसांच्या वेणीचा एक, किंवा दोन शेपटे. जरा भडक डिझाइनची पांचवारी सुरेख साडी-अशी तिची मूर्ति आहे. ती येते व रागारागानें पायांतल्या चपला दाराजवळील स्टॅन्डजवळ भिरकावते, कोचाजवळ येते, खांद्यावर अडकविलेली पर्स टेबलावर आदळते, आणि कोचावर दाणकन बसून डोळे मिटून घेते.

क्षणभरानें वसंत येतो. वयानें २४-२५. दिसायला ठीक आहे; पण चेहऱ्यावर एक भीतीची, व त्यामुळेंच कदाचित् बावळट वाटणारी झाक. सुरेख इस्तरीचे कपडे, केस मुद्दाम अस्ताव्यस्त ठेविल्यासारखे. तो बिचकत, काळजीपूर्वक डोकावत, आंत येतो व हळूहळू सुलभेजवळ जातो. ]

**वसंत** : सुलभा ! ( ती कांहींच उत्तर देत नाहीं हें पाहून ) सुलभा ! मी आलों आहे.

**सुलभा** : ( डोळे न उघडतांच ) दिसतंय् मला !

**वसंत** : ( आश्चर्यानें ) डोळे बंद करूनहि दिसतं तुला ?

**सुलभा** : ( डोळे उघडून त्याच्याकडे पाहात ) हो ! डोळे बंद करूनहि दिसतंय् मला. आणि कान झाकूनहि स्वच्छ ऐकूं येऊं लागलं आहे !

**वसंत** : सुलभा, मी केव्हांहि तुझ्याशीं बोलायला आलों तरी तूं रागावतेसच. मीं असं काय केलं आहे तुझं ?

**सुलभा** : माझ्यावर प्रेम करतो आहेस ना ?

**वसंत** : ( किंचित् लाजून ) मोजून अकरा महिने अन् सत्तावीस दिवस झाले आहेत.

**सुलभा** : हो ना ? मग याच्यापेक्षां आणखी वेगळा अपराध कोणता पाहिजे ? आणि वर विचारतोस काय केलं म्हणून ?

**वसंत** : ‘ प्रेम केलें काय झाला हा गुन्हा ’ ?

**सुलभा** : ( चिडून ) वसंत ! तुझं काव्य बंद कर पाहूं ! वीट आला आहे मला ! घरांतल्या घरांत पत्र काय लिहितोस, कविता काय पाठवितोस ! तुझ्या मेंदूंत कांहीं विकृति झाली आहे का ?

**वसंत** : मग काय करूं, सुलभा ? तूं कधीं माझ्याशीं नीट बोलत नाहींस. मी बोललों तर ऐकून सुद्धां घेत नाहींत.

**सुलभा** : त्यापेक्षां माझा उघड उघड छळ कां करत नाहींस ? हे उपद्व्याप

करण्यापेक्षां आणि माझ्या मागं मागं भुतासारखं हिंडण्यापेक्षां, तुझा छळ पुरवेल !

**वसंत** : ( हिरमुसलेपणानें ) बरं, आतां नाहीं असं करणार ! शपथ घेऊन सांगतों.

**सुलभा** : ही शपथ पाळलीस तर तुझ्याविषयीं माझं मत बदलण्याची शक्यता आहे. आणखी एक कर.

**वसंत** : ( उत्सुकतेनें ) सांग. यापूर्वीच असं बोलली असतीस तर येव्हांना करून दाखवलं असतं.

**सुलभा** : हे परीटघडीचे कपडे घालून, केस फिंदारून, रानोमाळ भटकण्यापेक्षां पुन्हां कॉलेजांत जाऊन शिक्षण पुरं कर तुझं.

**वसंत** : ( निराशेनें ) ही अशक्य अट घालून तूं माझ्या आशेचा चुराडा करून टाकला आहेस, सुलभा ! मॅट्रिकचं वर्षच मी टाय्फॉइड्च्या दुखण्यासारखं काढलं आणि त्यांतून कसाबसा जिवानिशीं सुटलों. कॉलेजच्या अभ्यास मला झेपायचा नाहीं. फर्स्ट इयरमध्येंच चार वर्षं गेलीं. आतां माझी हिंमत नाहीं.

**सुलभा** : ( चिडली असूनहि तिला आपलें हांसूं आवरत नाहीं. ) अरे, मग बायकोचं पोट कसं भरणार तूं ?

**वसंत** : आमची इस्टेट आहे ना !

**सुलभा** : सध्यां तरी, पैसा लागला म्हणजे तुला बापाचीं बोलणीं खाऊन मागून घ्यावा लागतो. खरं ना ?

**वसंत** : माझं लग्न होऊं दे. दादांनीं ऐकलं नाहीं तर वेगळा होईन. इस्टेटीचा माझा वांटा मागून घेईन.

**सुलभा** : कोणाशीं लग्न करणार आहेस ?

**वसंत** : ( लाजून ) तुझ्याशीं.

**सुलभा** : ( उपरोधानें ) मग वाट पाहा हं ! मला कोणीहि नवरा मिळाला नाहीं म्हणजे तुझा विचार करीन हं मी !

**वसंत** : ( न समजून ) खरंच विचार करशील माझा ?

**सुलभा** : ( चिडून ) तूं आतां जाशील का ?

**वसंत** : मग मी वाट पाहूं ना ?

**सुलभा** : ( ओरडून ) वसंत ! तुला जायला सांगितलं आहे ना मी ? मी या वेळीं अतिशय चिडलेल्या मनःस्थितींत आहे. माझा असा छळ करशील तर—

[ ती उठून उभी राहते तिचें अवमान पाहून वसत हळूहळू मागें सरतो, आणि मागल्या पावलीं निघून जातो. तो गेल्यावर—]

**सुलभा** : बावळट मेला !

[ तिचा चढलेला आवाज ऐकून सुमति भेपाकघरातून बाहेर येते. सुमतीचें वय २३–२४. दिसायला ती सुलभेसारखीच आहे. तिची आवड फिके रंग व साधेपणाची आहे कासोट्याचें नेसणेंहि तिला आवडते. सैलसा अंबाडा. ती सुलभापेक्षां उंचीनें कमी आहे; आणि नऊ वारी साडींत आणखी ठेंगू वाटते ]

**सुमति** : सुलू, कोणावर चिडली होतीस येवढी ?

**सुलभा** : आपले घरमालकांचे चिरंजीव !

**सुमति** : उगीच चिडतेस तूं त्याच्यावर. भोळसट आहे तो.

**सुलभा** : आक्का, कां कुणास ठाऊक, पण वसंताला पाहिलं कीं मला त्याच्या अंगावर ओरडावंसंच वाटतं !

**सुमति** : ( हंसत ) तुझा राग काढायला तुला कोणी तरी हवंच असतं. तो बरा सांपडला आहे बिचारा ! मुकाट्यानं एकून घेतो सारं, आणि तरीहि तुझ्यावर प्रेम करतो !

**सुलभा** : ( चिडखोरपणानें ) करील तर काय झालं ! बाबा आपल्या नोकरीच्या नांवाखालीं कुठं भटकत असतात याचा पत्ता आपल्याला नाहीं. घराचा उपयोग ते एखाद्या हॉटेलसारखा करीत असतात ! घरांत केव्हां पैसा असेल याचा नेम नाहीं. एक महिना दिवाळी अन् अकरा महिने होळी ! असं चाललं आहे आपलं आयुष्य. बंगल्यांतल्या रस्त्यावर आलेल्या वेलीसारखं झालं आहे आपलं. इकडे तिकडे पाहून कोणींहि हात लांब करावा अन् तोडावींत फुलं ! वसंतचंच कशाला सांगतेस ? या गल्लींतले किती तरी लोक आपल्यावर प्रेम करीत असले पाहिजेत !

**सुमति** : ( दचकून ) सुलू ! झालंय् तरी काय तुला आज ? ( कल्पना येऊन ) भिड्यांच्या दुकानांत तुझा अपमान झाला ना ? मग दुसऱ्या दुकानांत—

**सुलभा :** हो तर ! आपल्या बापाचीच लेक तूं ! एका दुकानचं बिल फुगलं आणि सामान मिळेनासं झालं कीं नवीन दुकानांत खातं उघडायचं ! पण आक्का, आतां आपल्याला सारे ओळखायला लागले आहेत. मुलींच्या सुंदर चेहऱ्यावर उधार माल मिळवायची बाबांची वृत्ति आतां काम देईनाशी झाली आहे !

**सुमति :** ( व्यथित होऊन ) किती झोंबेल असं बोलतेस ग ! मला वाटलं, तूं माझ्यासारखी चार भिंतींत अडकलेली नाहींस...बाहेर जाते येतेस—

**सुलभा :** खरं आहे आक्का ! आई गेल्यापासून तूं घेतली आहेस तिची जागा घरांत, अन् मी झालें आहे बाजारमास्तर ! पण आक्का, या भिंतींच्या आड, तुझ्या वाटेला, फक्त चिंता आहे. मला मात्र टवाळी, त्रास, आणि अपमान-सुद्धां सहन करायची वेळ येते बाहेर, याची तुला कल्पना नाहीं !

**सुमति :** कल्पना कशी नाही, सुलू ? पण तूं चतुर आहेस, धाडसी आहेस. बाहेरचे आघात सहन करण्याची शक्ति माझ्यापेक्षां तुझ्यांत अधिक आहे. घरांतल्या मोठ्या मुलाच्या जागी मी तुला लेखीत आलें आहे. तरीमुद्धां, माझ्यापुरताच प्रश्न असता तर मी हे अपमानाचे प्रसंग येऊं दिले नसते. येवढा तरी विश्वास वाटतो ना माझा ?

**सुलभा :** आक्का, तुला दुखवावं असं वाटतं कां ग मला ? पण मी तरी काय करूं ? हे मानहानीचे प्रसंग सांगूं तरी कोणाजवळ ? तुझ्यावर विश्वास नसता आक्का, तर एव्हांना या घरांतून मी पळून तरी गेलें असतें, किंवा कुठं तरी जाऊन जीव तरी दिला असता !

**सुमति :** ( तिच्या तोंडावर एकदम हात ठेवीत ) सुलू, असं अभद्र बोलायचं नाहीं. माझी शपथ आहे तुला.

**सुलभा :** ( किंचित् शान्त होऊन ) आक्का, धक्का लागून फुटलं म्हणजे हें असं वाहायला लागतं ! वेळेवर फी दिली जात नाही म्हणून लाजेनं शिक्षण बंद झालं. घरभाडं थकल्यामुळं, आतां एक दिवस रस्त्यावर यायचं तेवढं राहिलं आहे ! काय होणार आहे आपलं ?

**सुमति :** ( गंभीरपणानें ) हेच विचार केव्हां केव्हां माझ्या मनांत येतात !

**सुलभा :** माझं या विचारानं डोकं फुटायची वेळ आली आहे. वाटायला लागलं आहे कीं, आपणच आतां हुकमी कमाई करायला लागावं—

**सुमति** : ( तिच्या शब्दांतील खोच उमजून, भीतीनें ) सुलू, किती भयंकर बोलते आहेस तूं !

[ सुलभेच्या डोळ्यांत अश्रु तरगायला लागले आहेत. सुमतीलाहि भरून येतें. ती सुलभेच्या जवळ जाते व तिला जवळ घेते. ]

**सुमति** : सुलू ऽ ! रागावलीस ना माझ्यावर ?

**सुलभा** : ( स्वतःला सावरीत ) नाहीं, आक्का ! पण तुझ्या या अबोल सहनशील-पणाची चीड येते एखाद्या वेळीं अशी. या अबोलपणानंच आईनं, आणि आतां तूं, बाबांना न कळत उत्तेजन दिलेलं आहे. बाहेरच्या जगाला बाबांचं मन मेलं आहे—त्यांना मन तरी आहे कीं नाहीं कोणास ठाऊक ! त्यांचे जे काय उद्योग असतील त्यांची त्यांना लाज नाहीं कीं खंत नाहीं. पण बाहेरचं जग अमक्याच्या मुली म्हणून आमच्याकडे पाहातं. त्या दृष्टीचे चटके किती अन् कसे सहन करायचे ? आपल्याला कोणी पत्करणार तरी आहे का ?

**सुमति** : सुलू, जगांत कुठं तरी चांगुलपणा असेलच ना ? त्यावरील माझा विश्वास ढासळलेला नाहीं. आणि बाबांचाहि अविश्वास करायला माझं मन अजून तयार होत नाहीं. ते काल उभ्या उभ्या येऊन गेले...ते चिंतेंत होते हें स्पष्ट दिसत होतं. म्हणून मी घरचं कांहीं बोललें नाहीं. पण पैसे घेऊन येण्याचं वचन त्यांनींच मला आपणहून दिलं.

**सुलभा** : तुला खात्री आहे बाबांच्या बोलण्याची ?

**सुमति** : चिडूं नकोस अशी ! माझी मनोदेवता सांगते कीं बाबा आज नक्की येतील. मला दुसरीच काळजी वाटते आहे. बाबांच्यावर कांहीं तरी संकट आलेलं आहे खास ! ( एकदम ) त्यांच्या बरोबरचा तो गृहस्थ कोण होता ग ?

**सुलभा** : केमिकल् कंपनीचा असिस्टंट मॅनेजर.

**सुमति** : म्हणजे, बाबांच्या कंपनीचाच ना ? वाटलंच मला. त्या दोघांच्यीं खूप बोलणीं चाललीं होतीं. तो गेल्यावर बाबाहि जरा वेळानं गेले. ( आशंकेनें ) काय होणार आहे ग, सुलू ?

**सुलभा** : ( उपरोधानें ) कांहीं काळजी करूं नकोस, आक्का ! बाबा साऱ्या जगाचं बारसं जेवून बसले आहेत ! कांहींहि संकट असलं तरी ते सहीसलामत सुटून येतील.

**सुमति** : ( सरळपणें ) तुझ्या तोंडांत साखर पडो !

**सुलभा** : सध्यां तरी माती पडली आहे खरी !

**सुमति** : ( आठवण येऊन ) बोलण्याच्या नादांत आपण भलतीकडेच वहात गेलों. मी म्हणत होतें कीं, बाबा येईपर्यंत कांहीं तरी करायला हवं. सुधीर जर आतां भूक भूक करीत आला तर त्याच्या चिमण्या तोंडांतसुद्धां घालायला कांहीं नाहीं घरांत. म्हणून म्हणत होतें—

[ सुलभा तोंड फिरवून दूर जाऊन बसते ]

( तिच्याजवळ जात, प्रेमळ स्वरानें ) सुलू, पंडितहि आला नाहीं बरेच दिवसांत. नाहीं तर, त्याच्याकडे उसने मागण्याचा प्रयत्न केला असता. तुला नाहीं का मिळणार कुठं ?

[ सुलभा आणखी तोंड फिरवून तशीच बसून राहते ]

( एकदम ) मग असं कर, सुलू. ( हातांतल्या बांगड्या काढून तिच्यापुढें करीत ) हे घे—

**सुलभा** : ( तिच्याकडे पाहून, दचकत ) आक्का !

**सुमति** : ( हंसून ) अग, त्याला काय झालं ? याच्यावर तरी मिळेल ना सामान !

**सुलभा** : ( अश्रुपूर्ण मुद्रेनें ) तुझ्या या अशा वागण्यानंच—

[ अश्रू लपवीत ती तशीच पुढें जाऊन चपला घालते, ध्यानात येऊन पुन्हां मागें कोचाजवळ येऊन टेबलावरची पर्स उचलते व जाऊ लागते. ]

**सुमति** : अग, हें राहिलं. ( बांगड्या तिच्यापुढें करते. )

**सुलभा** : नको, मी पाहातें.

[ सुलभा निघून जाते. क्षणभर तशीच उभी राहून सुमति कोचाकडे जाते. मग विचार बदलून ती बांगड्या हातात घालीत घालीत सैपाकघराच्या दारानें आंत जाते- क्षणभरानें जिन्यावर बुटाचीं पावलें वाजतात आणि आंत येणारे शामराव दिसतात. शामराव दिसायला रुबाबदार आहेत. पाहणाराच्या मनांत आपुलकी उत्पन्न व्हावी असें मार्दव त्यांच्या मुखावर आहे. वयानें ते बरेच असले पाहिजेत; पण चाळीसपेक्षा अधिक दिसत नाहींत. उत्कृष्ट शिलाईचा सूट, टाय, डोक्यावर फेल्ट. या वेळीं ती कपाळावरून किंचित् मागें झुकलेली आहे. टायची गांटहि खालीं ओढून घेतलेली आहे. बटनहोलमधून कोटाच्या वरच्या खिशांत लोंबणारी घड्याळाची सांखळी स्पष्ट दिसते आहे. डाव्या हातांत मध्यम आकाराची सुंदर सूटकेस आहे. जिन्याकडे खालीं

पहात पहात ते आंत येतात, समोरच्या भिंतीशीं असलेल्या छोट्या टेबलावर सूटकेस ठेवतात, आणि पुन्हां जिन्याजवळ जाऊन तबकडीतून हाक मारतात. ]

**शामराव** : सुधी ऽ, ए सुधी ऽ! कुठं पळालास पुन्हां ? अरे, रात्र होत आलीय्. ये घरांत. मी तुझ्यासाठीं काय गंमत आणली आहे बघ तर खरी !

[ शामरावाचा आवाज ऐकून सुमति बाहेर आलेली आहे, पण शामराव सुधीरशीं बोलण्यात गुग आहेत. थोड्याच वेळात सुधीर येतो. त्याचं वय सहा-सात वर्षांपेक्षा अधिक नाहीं. दिसायला अतिशय गोंडस आणि गुटगुटीत. मस्तकावर विपुल केस. या वेळीं सारे केस विसकटलेले आहेत, त्यामुळे तो अधिकच आकर्षक दिसतो. अंगात, युरोपिअन मुलांच्या अंगात असतो तसा रॉम्पर. शामराव त्याला उचलून घेतात; मधल्या वाटोळ्या टेबलावर बसवितात आणि स्वत: कोचावर बसतात. ]

**शामराव** : काय करीत होती आमची सुधी ?

**सुधीर** : मी खेळत होतों. काय गंमत आणली आहे, दाखव !

**शामराव** : अगोदर एक पपी दे. मग दाखवीन.

**सुधीर** : अंहं ! अगोदर गंमत दाखव.

**शामराव** : बरं बुवा !

[ शामराव उठून सूटकेस आणतात. सुधीरची अधीर बडबड सुरू होते. शामराव सूटकेसमधून एक तलम, उंची फ्रॉक बाहेर काढतात; " आहे कीं नाहीं छान गमत ? " असे कांहीसे म्हणत त्याच्या अंगात तसाच फ्रॉक चढवतात. ]

**सुधीर** : आरसा दाखव.

**शामराव** : हो का ? सुंदर दिसते हो आमची सुधी !

[ त्याला आलमारीच्या आरशासमोर घेऊन उभे राहतात; त्या वेळीं स्वैपाकघराच्या दाराशीं उभी असलेली सुमति त्यांना दिसते. सुधीरला खालीं ठेवून ते तिच्याकडे येतात. ]

**सुधीर** : चाकलेट दे मला.

[ शामराव खिशांतून चॉकलेट काढून त्याला देतात. तो दुसरा हात पुढे करतो, हसत आणखी एक वडी त्याच्या हातावर देतात. सुमतीच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून, सुधीर पुन्हां दडदड धांवत बाहेर जातो. ]

**सुमति** : केव्हां आलांत, बाबा ?

**शामराव** : आतांच. सुधीरशीं बोलण्याच्या नादांत तुला पाहिलंच नाहीं.

**सुमति** : ( काळजीनें ) काय झालं त्या गृहस्थाचं ?

**शामराव** : कोणत्या ?

**सुमति** : काल आला होता तो ? तुमच्या कंपनीचा असिस्टंट मॅनेजर.

**शामराव** : तो होय ? गेला आपल्या घरीं.

**सुमति** : पैसे द्यायचे होते ?

**शामराव** : हं.

**सुमति** : तो तर पोलिसकडे जायची भाषा करीत होता !

**शामराव** : मूर्ख आहे, झालं !

**सुमति** : कसचे पैसे द्यायचे होते, बाबा ?

**शामराव** : अग, डॉक्टर–लोकांना आम्ही आमच्या कंपनीचीं औषधं विकतों. ते औषधं घेतात, पण पैशासाठीं पंचवीस चकरा मारायला लावतात ! कांहीं व्यापाऱ्यांची वसुली राहिली होती. थोडेसे पैसे माझ्या हातून खर्च झाले होते. म्हणून गेल्या तीन चार महिन्यांत कंपनींत जाऊन हिशोब द्यायला मला जमलं नाहीं. कोणी तरी खोटं सांगितलं आणि डायरेक्टरला वाटलं कीं मी पैसे आणि माल घेऊन फरारी झालों. अन् बिचकले सारे ! (हंसतात.)

**सुमति** : मग, भरलेत पैसे ?

**शामराव** : हो तर ! मी गेलों होतों तें गांवोगांवची वसुली करण्यासाठींच. पैसे आणले अन् भरून टाकले.

**सुमति** : बाबा, असं कां करतां तुम्ही ?

**शामराव** : ( भोळेपणानें ) काय केलं मी, आक्का ?

**सुमति** : लोकांच्या पैशाची फिरवाफिरवी ! कशाला असे देणेदार करून ठेवतां ?

**शामराव** : (हंसत) माझी उलटतपासणी चालवली आहेस अगदीं ! ( गंभीरपणें ) पण आक्का, तुला दिसत का नाहीं ? पहिल्या तारखेला पगार यायला मला कांहीं सनदी नोकरी नाहीं.

**सुमति** : असती तरी तुम्ही केली असती कीं नाहीं कोणास ठाऊक !

**शामराव** : (हंसून) खरं आहे, आक्का ! अशी यान्त्रिक नोकरी करणं मला माझ्या आयुष्यांत जमलं नाहीं. ( किंचित् थांबून ) या कमिशनच्या धंद्यांत केव्हां तरी पैसे हाताशीं येतात. आले कीं मी सर्वांचे देऊन टाकतोंच.

**सुमति** : खरं आहे हें, बाबा ?

**शामराव** : ( चमकून ) म्हणजे काय ?

**सुमति** : आज हा फ्रॉक आणण्याची काय जरूर होती ?

**शामराव** : ( मोठ्यानें हंसत ) फ्रॉक होय ? आक्का, तूं विसरली असशील कदाचित्. तुझ्या आणि मुलीच्या पाठीवर किती तरी वर्षांनीं सुधीरचा जन्म झाला. तुझ्या आईला मुलगा हवा होता; मला मुलगीच हवी होती. तिची इच्छाच खरी झाली. पण ती त्यानंतर फार दिवस राहिली नाहीं ! ( थांबून ) पण तिनं माझ्या इच्छेला कधींच विरोध केला नाहीं.

**सुमति** : माझ्या बोलण्याचा अर्थ तुम्हाला समजला नाही, बाबा ! सुधीरला तुम्ही फ्रॉक आणा, परकर-पोलकं आणा, नाहीतर वेण्या आणा. त्याबद्दल मी तरी काय म्हणाले आहे ? पण लोकांचं देणं येवढं असतांना जवळचे पैसे अशा रीतीनं खर्च करणं हें योग्य आहे का ?

**शामराव** : वाः आक्का ! आपल्या मुलांचं कौतुक आपण करायचं नाहीं तर —

**सुमति** : या कौतुकाचीसुद्धां जरूर नाही ! पेटीभर कपडे आहत सुधीरला. गेल्या वेळी आम्हांला अशींच रेशमी पातळं आणून ठेवलीत !

**शामराव** : अग, तुमच्यासाठी मी येवढं करतों—

**सुमति** : तेंच अनाठायी आहे.

**शामराव** : ( हंसत ) चांगलीच कृतज्ञता दाखवते आहेस !

**सुमति** : तसं नाही, बाबा ! तुम्ही घरीं केव्हां याल याचा नेम नाहीं. देणेकरी दाराशीं येऊन उभे राहिले तर आम्ही काय करायचं ? दुकानदारांचीं बोलणीं कोणी खायची ? आणि वर घरांत कांहीं नसलं म्हणजे मग हे ट्रंकाभर कपडे कांहीं उकडतां येत नाहीत, कीं हें फर्निचर शिजवतां येत नाहीं.

**शामराव** : घरांत कांही नाहीं ? म्हणजे ?

**सुमति** : खरंच कांहीं नाही, बाबा. तुम्हीं साधा चहा मागितलांत तरी मी देऊं शकणार नाही.

**शामराव** : पण मी तर दोन दुकानीं खातीं उघडलीं आहेत.

**सुमति** : हो... अन् सुलू आज तिसरा वाणी शोधायला गेली आहे. ती गेली अन् तुम्ही आलांत.

**शामराव** : वाण्यानं सामान दिलं नाहीं ?

**सुमति** : नाही.

**शामराव** : ( चिडून ) हलकट साला !

**सुमति** : ( रागानें ) बाबा ! आपलं चुकतं अन् वर लोकांना कां शिव्या ? हा कौतुकाचा वायफळ खर्च बंद करून लोकांचीं बिलं वेळेवर दिलीं असतीं तर असा नामुष्कीचा प्रसंग येता ना !

**शामराव** : ( एकदम ) आक्का, कोणत्या दुकानीं गेली आहे सुली ?

**सुमति** : कां ? काय करणार आहांत तुम्ही ?

[ शामराव तिच्याकडे पाठ करून लिहिण्याच्या टेबलाकडे जातात व खिशांतून काळजीपूर्वक मोजक्या नोटा बाहेर काढतात ]

**शामराव** : ( नोटा तिच्यापुढें करीत ) हे घे.

**सुमति** : ( आनंदानें ) अय्या, किती आहेत ? ( एकेक नोट मोजूं लागते. )

**शामराव** : आक्का ! यापुढं आतां कोणाचं देणं म्हणून ठेवायचं नाहीं !

**सुमति** : शंभर आहेत हे.

**शामराव** : आणखी हवेत का ?

**सुमति** : आहेत तुमच्याकडे ?

**शामराव** : हो, तूं बिलं बोलावून घे. तोंपर्यंत मी माझा हिशेब लिहून ठेवतों. आक्का, यापुढं पैसे आले कीं सारे तुझ्याच हातीं देत जाईन. माझ्या हातून उगीच खर्च व्हायला नकोत.

**सुमति** : (आनंदानें) बाबा, खरंच असं करा, म्हणजे आम्हांलाहि अवघडल्यासारखं होणार नाही. विष्णुपंत दोन-तीनदां येऊन तावातावानं बोलून गेले. घराचं भाडं द्यायचं आहे.

**शामराव** : तुला सांगितलं ना ? कोणाची पै म्हणून राहूं देत नाही आतां. कोणाची मिजासहि नको आणि उपकारहि नकोत.

**सुमति** : थांबा हं, बाबा ! मी सुलूला फोन करून पाहातें अगोदर. भिड्यांच्या नाहीं तर उत्तमचंदच्या दुकानींच बहुधा गेली असेल. आलेंच हं मी. तोंपर्यंत तुम्हांला कांहीं हवंय् का ?

**शामराव** : कांहीं नको. आंघोळ करायचा विचार आहे गार पाण्यानं. बरीच वणवण झाली आहे.

**सुमति** : मी कपडे काढून देतें तुमचे.

**शामराव** : राहूं दे ग ! मी घेईन माझ्या हातानं.

[ चटदिशीं आंत जाऊन सुमति किल्ल्या आणते व आलमारी उघडून त्यांतून टर्किश टॉवेल, सिल्कचा पायजामा आणि तसलाच ओव्हरऑल काढून टेबलावर ठेवते. आलमारी बंद करून तशीच बाहेरच्या दाराने जाते.

ती जातांच शामराव चपलतेने आलमारीकडे वळतात. आपल्या जवळच्या चावीने आलमारी उघडतात. त्यातील कपड्यांच्या घड्या बाहेर काढतात. आडव्या फळीची पुढील पट्टी हळूच बाजूला केल्यावर आंतील चोरकप्पा दिसतो. खिशातल्या बहुतेक नोटा त्यांत ठेवून, ते सारें पूर्वीमारखें करून ठेवून, आलमारी बंद करतात. उरलेल्या नोटा लिहिण्याच्या टेबलाच्या खणांत ठेवून तो चावीनें बंद करतात. मग एक सिगारेट शिलगावून, सुमतीने काढून ठेवलेले कपडे उचलून, सैपाकघराच्या दारानें आंत निघून जातात.

क्षणभरानें पंडित येतो. तिशीच्या सुमाराचा हा तरुण मेडिकल कॉलेजांत शेवटच्या वर्षाला आहे. उंची मध्यम, किंचित् स्थूल, वर्ण सावळा. नाकावर रिम्-लेस चष्मा. यावेळीं त्यानें फक्त ट्राउझर व पांढरा शर्ट घातलेला आहे; शर्टच्या बाह्या निष्काळजीपणानें वर केलेल्या आहेत. मुखावर काळजीची छटा. तो येतो आणि सरळ कोचावर बसून राहातो. सुमति येते. ]

**सुमति** : ( लक्ष जाऊन ) पंडित ? केव्हां आलास ? थांब हं.

[ त्याला उत्तर द्यायला अवसर न देतां ती सैपाकघरांत जाते. आतील दिवा लागतो. थोड्या वेळानें ती बाहेर येते. खोलींतले दिवे पेटविते आणि हे करीत असतांना बोलू लागते. ]

**सुमति** : चहाचं आधण ठेवून आलें.

**पंडित** : ( उठून तिच्याकडे जात ) सुमति, तुझे बाबा कुठं आहेत ?

**सुमति** : कां ?

**पंडित** : मुद्दाम विचारलं. माहीत आहे तुला ? किती दिवसांत त्यांचा पत्ता नाहीं ?

**सुमति** : ( येणारें हासूं दाबीत, मिष्किलपणानें ) दोन-अडीच महिने तरी झाले असतील ! काल आले पण लगेच घाईघाईनं गेले.

**पंडित** : कांहीं बोलले तुझ्याशीं ?

**सुमति** : अं...? म्हणाले कीं, फार महत्त्वाचं काम आहे...घरीं परत केव्हां येईन तें नक्की नाहीं.

**पंडित** : बरोबर होतं कोणी ?
**सुमति** : एक गृहस्थ होता—
**पंडित** : तुझ्या ओळखीचा आहे ?
**सुमति** : नाहीं बाई !
**पंडित** : त्याचं काय काम असावं याची कल्पना आहे तुला ?
**सुमति** : बाबांच्याकडे साऱ्यांचीं पैशाचींच कामं असतात.
**पंडित** : ( गंभीरपणें ) सुमति, हें साधं प्रकरण नाहीं !
**सुमति** : ( घाबरून ) अय्या ! म्हणजे काय ?
**पंडित** : तुला कांहींच माहीत नाहीं ! तो गृहस्थ बाबांच्या कंपनींतला कोणीतरी मोठा अधिकारी असला पाहिजे.
**सुमति** : हो ?
**पंडित** : गेल्या चार महिन्यांत बाबांनीं कंपनीच्या ऑफिसांत तोंड दाखवलं नाहीं कीं विक्रीचा हिशोब दिलेला नाहीं !
**सुमति** : पण तुला कसं कळलं ?
**पंडित** : सहजच ! (एकदम) या कंपनींतून आम्ही आमच्या हॉस्पिटल्साठीं औषधं घेत असतों. निकड असली तर नर्स स्वतः जाऊन महत्त्वाचीं औषधं घेऊन येते. ती आमच्या वॉर्डमध्यें मोठ्यामोठ्यानें कोणाला तरी सांगत होती. तिला सारी हकीकत इत्थंभूत कळली आहे. बाबांचं नांवहि तिच्या बोलण्यांत येत होतं. अर्थात् माझा संबंध तिला माहीत नव्हता—
**सुमति** : खरं कां हे पंडित ?
**पंडित** : तूं आपली घरांत बसून राहात जा ! आणि कोणी कांहीं सांगितलं तरी ऐकत जाऊं नकोस !
**सुमति** : मला नाहीं वाटत बाबा असं करतील !
**पंडित** : ( चिडून ) हेंच तें ! तुला वाटतं, आपले वडील मोठे—
**सुमति** : पंडित, माझा बाबांच्यावर पूर्ण विश्वास आहे. आणि तो ढासळून जावा असं कांहींहि घडलेलं नाहीं.
**पंडित** : ( जोरानें ) मी सांगतों तुला ! कंपनीचे पैसे आणि माल घेऊन बाबा फरारी झालेले आहेत !
**सुमति** : ( मनापासून हंसत ) कोणी सांगितलं तुला पंडित ?

**पंडित** : ( चिडून ) सांगितलं कोणी तरी ! लोक काय धादांत खोटं बोलतात असं तुझं म्हणणं आहे ?

**सुमति** : ( हंसत ) काय बोलतात लोक ?

**पंडित** : ऐकून तरी काय करायचं ? दुनिया खोटी अन् तुझे बाबा तेवढे खरे !

**सुमति** : पंडित, तुझं बोलणं चुकीचं आहे असं मी सिद्ध करून दिलं तर ? अगदीं या क्षणाला—

**पंडित** : ( चिडखोरपणें ) म्हणजे, मी थापा मारतों असंच ना ?

**सुमति** : असं नाहीं पंडित—

**पंडित** : ( मध्येंच ) ठीक आहे ! तुझ्या मनांत कांहीं बदल होईल अशी जी अपेक्षा मी केली होती, तीच गाढवपणाची आहे ! मीच यापुढं इथं येणं बंद केलं पाहिजे !

**सुमति** : तुला आमचा कंटाळा आला असेल तर खुशाल तसं कर. त्यासाठीं या अशा युक्त्या नकोत. मी कांहीं तुला बांधून ठेवलेलं नाहीं.

**पंडित** : सुमति, माझ्या बोलण्याचा विपर्यास करते आहेस तूं. कसं सांगूं तुला ?... तुला वाटतं, तुझ्या बाबांचा कमिशन एजन्सीचा धंदा आहे. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, लोकांना फसविणं...त्यांचे पैसे बुडाविणं—

**सुमति** : ( एकदम, रागानें ) पंडित ! मी बाबांच्याविरुद्ध एक अक्षरहि ऐकून घ्यायला तयार नाहीं ! तुला हे शब्द बोलायचे असतील तर उभा राहूं नकोस इथं !

**पंडित** : ( तिच्या आविर्भावानें थिजून ) सुमति ! मला तुमच्याबद्दल कांही वाटतं, म्हणूनच हें सारं सांगायला मी आलों ना ? मला कान आहेत, मनहि आहे; आणि आम्हांलाहि कांहीं सामाजिक दर्जा आहे ! जग काय म्हणतं याची पर्वा न करणारा मनुष्य एक साधु तरी असला पाहिजे किंवा बेरड तरी असला पाहिजे. ( एकदम ) तुला माहीत नाहीं सुमति ! गेल्या पंधरवड्यांत आबांची सात–आठ तरी पत्रं आलीं असतील. आपल्याविषयींचं सारं सारं त्यांना सांगावं लागलं मला. परवांच्या पत्रांत तर त्यांनीं लिहिलं आहे कीं एक दिवस मीच येतों मुंबईला ! त्यांना जर समजलं कीं तुझे वडील—

**सुमति** : पंडित ! तुझ्या वडलांची भीति मला कशाला दाखवतोस ? तुझे वडील मोठे आहेत. आम्ही सामान्य माणसं आहोंत...हलकट आहोंत. झालं आतां ? योगायोगानं झालेली ओळख वाढवायला मी तर आलें नव्हतें ना ? कां येत होतास तूं आमच्याकडे ?

**पंडित** : सुमति—

**सुमति** : गेल्या आठवड्यांत अजिबात तोंड दाखवलं नाहीस इकडे. तसंच कर. तुझी चूक सुधारायला तुला अजून पुष्कळ वेळ आहे !

[ स्वतःला येणारें रडूं लपविण्यासाठीं ती आवेशानें सैपाकघरांत निघून जाते. पंडित तिच्याकडे पहातच रहातो

तेवढ्यांत बाहेरच्या दाराशीं सुलभा आलेली दिसते. तिच्या मागें दुकानचा माणूस आहे आणि त्याच्या मागें सामानानें भरलेला हारा घेऊन गडी उभा आहे. सुलभा सैपाकघराच्या दाराशीं जाऊन मोठ्यानें हाक मारते. ]

**सुलभा** : आक्का, ए आक्का ऽ ! हे सामान आलंय ग ! पैसे घेऊन ये अगोदर !

[ सुमति पैसे घेऊन बाहेर येते. दुकानचा माणूस तिला बिल देतो. ते पाहून ती पैसे देते. मग सुलभाखेरीज सर्वच जण सैपाकघराच्या दारानें आंत जातात. सुलभा पुढें येते. तिचें व पंडितचें बोलणें चालू असतांना, मध्येंच केव्हांतरी दुकानचा माणूस व गडी येऊन बाहेरच्या दारानें निघून जातात. ]

**पंडित** : हा काय प्रकार आहे, सुलभा ?

**सुलभा** : हा ना ? हें आमचं जीवन ! हाताशीं पैसे असले म्हणजे असं डोक्यावरून मिरवीत येतं.

**पंडित** : पण... येवढं सामान आणायला पैसे ?

**सुलभा** : तूं कधीं फारसे दिले नाहीस. मीहि अजून कमाई करूं लागलें नाहीं. तेव्हां घरांत पैसे येण्याचा एकच मार्ग आहे—बाबा !

**पंडित** : बाबांनी पैसे पाठवले ?

**सुलभा** : मग ? आकाशांतून पडले ?

**पंडित** : बाबा कुठं असतील अशी तुझी कल्पना आहे, सुलभा ?

**सुलभा** : घरांतच आहेत.

**पंडित** : घरांत ? यावेळीं ? ( मोठ्यानें हंसतो. )

**सुलभा** : ( आश्चर्यानें ) म्हणजे ? आक्कानं काय थापा मारल्या मला ?

**शामराव :** ( एकदम प्रवेश करून ) छे ! आक्का कधींच खोटं बोलत नाहीं.

[हासत हासत शामराव आलमारीकडे जातात व आरशासमोर केस विंचरू लागतात. ते मघाचा पायजमा व ओव्हरऑल नेसले आहेत. टॉवेल खांद्यावरून लोंबतो आहे. केस विंचरतांना ते बोलू लागतात.]

फक्त जरा धांदरट आहे ती...अन् भोळी पण ! मी घरींच आहे हें, बोलण्याच्या नादांत, सांगायचं विसरूनच गेली ! तिनं तुला मुद्दाम फसवलं नाहीं पंडित. ( त्याच्याकडे वळून ) आमच्या कंपनीबद्दल काय म्हणत होतास तूं ?

[ पंडित जागच्या जागीं थिजून उभा आहे. ]

**सुलभा :** ( गोंधळून पण कुतूहलानें ) काय सांगत होतास रे पंडित ?

**शामराव :** सांग कीं ! मघां तर केवढ्या तावातावानं बोलत होतास. म्हणून तर मला बाथरूममध्यें ऐकूं आलं.

**सुलभा :** ( पंडितला बोटानें डिवचून ) पंडित—

**शामराव :** ( हंसून ) अरे, मी कांहीं रागावलों नाहीं. उलट, मी तुझा अत्यंत आभारी आहें. आपल्याविषयीं लोक काय बोलतात, हें प्रत्यक्ष ऐकण्याची संधि अशीं आली तरी एखादवेळींच येते आयुष्यांत.

**सुलभा :** ( दोघांच्याकडे आळीपाळीनें पाहात, अधीरपणें ) काय आहे तें सांगा ना मला कोणीतरी ! या गूढ बोलण्यानें माझा जीव कासावीस होऊन गेला आहे !

**शामराव :** ( हंसत ) या पंडितचं म्हणणं आहे—

**पंडित :** मी नाही, बाबा—

**शामराव :** ब ऽ रं ! लोक म्हणतात... कीं मी दुसऱ्यांना फसवितों...त्यांचे पैसे लुबाडतों, आमच्या कंपनीचे पैसे मी खाल्ले आहेत—

**सुलभा :** हो, पंडित ?

**पंडित :** मी—

**सुलभा :** ( एकदम ) बाबा ! हा आरोप खोटा कीं—?

**शामराव :** तुला काय वाटतं, सुले?

**सुलभा :** मला काय वाटतं यापेक्षां, खरं काय आहे हें अधिक महत्त्वाचं आहे !

**शामराव** : आपण आक्काला विचारूं. आक्का, ए आक्का ऽ—

**सुमति** : ( बाहेर येऊन, गंभीरपणें ) काय ? मी चहा करतें आहे.

**शामराव** : चहाचं राहूं दे. तुझ्या वडिलांचा निवाडा चालू आहे इथं. पंडितचं... आपलं, लोकांचं...असं म्हणणं आहे कीं मी—

**सुमति** : मला या बाबतींत कांहीं ऐकायचं नाहीं अन् सांगायचंहि नाहीं.

**शामराव** : मग आपण असं करूं ! ( सूटकेसमधून व्हिजिटिंग् कार्ड काढून आणतात आणि तें पंडितच्या पुढें करतात. ) या कार्डावर कंपनीचा फोन नंबर आहे. अजून आठ कांहीं वाजले नाहींत. ऑफिसांत फोन करून तूंच माझ्याविषयीं विचार.

[ पंडित शामरावांच्याकडे पाहात तसाच उभा राहातो. ]

**सुलभा** : ( त्यांच्या हातांतून त्वरेनें कार्ड घेत ) मी करतें फोन आणि विचारतें. चल रे, पंडित.

[ त्याचा हात धरून त्याला खेचून घेऊन जाते. ]

**शामराव** : ( सुमतिजवळ जात ) आक्का, तूं भारी हळव्या मनाची आहेस ! अग, असं एकदम इतकं सणकून जाऊं नये. माझ्यासारख्या बापाची मुलगी तूं !

**सुमति** : ( अश्रुपूर्ण मुद्रेनें ) बाबा !

**शामराव** : ( तिला जवळ घेत) ए वेडे ! रडतेस काय अशी ! तूं तर या घरांतली कर्ती मुलगी. मोठ्या मुलाच्या ठिकाणीं मला तूं आहेस ! तुझं मघाचं बोलणं ऐकून माझी छाती अभिमानानं इतकी फुगली कीं अंगावर पाणीसुद्धां राहीना.

**सुमति** : ( अनावर हासू येऊन ) चला !

**शामराव** : ( मनमोकळेपणानें हंसून ) पण आक्का, एक सांगतों तुला. इतका भोळा विश्वास कोणावर ठेवूं नये. स्वतःच्या बापावरसुद्धां !

**सुमति** : बाबा, मी नाही असं बोलूं देणार !

**शामराव** : असं नाहीं आक्का ! व्यवहार आणि भावना ही दोन वेगळीं जगं आहेत. त्यांची टक्कर झाली तर भावनाशील मनुष्याला फार मोठा धक्का बसतो. पण ही टक्करहि टाळतां येत नाहीं. अन् व्यवहारांत वागतांना, माणसाला

बहुधा कठोर होऊनच, कांहीं प्रसंगीं तर बदमाष होऊनसुद्धां, वागावं लागतं !

[ सुमति त्याच्याकडे अबोधपणे पाहात राहाते. शामराव हसतात. येवढ्यांत सुलभा व पंडित येतात. दोघांचेहि चेहरे गंभीर आहेत. ]

**शामराव** : हं ! काय समजलं फोनवर ?

**पंडित** : बाबा, मला क्षमा करा. पण मी खरंच सांगतों. प्रत्यक्ष ऐकलेल्या गोष्टी मी बोलत होतों. माझ्या पदरचं—

[ तो पुढें बोलत नाही. तसाच आवेगाने जाऊं लागतो. ]

**शामराव** : तूं मुळींच वाईट वाटून घेऊं नकोस, पंडित ! मला सर्व समजतं. अन् हें काय ? चाललास कुठं तूं ? ( मोठ्यानें ) अरे ए, चहा होतोय् ना !

**पंडित** : ( दाराजवळ ) मला नको यावेळीं.

[ पंडित तसाच निघून जातो. ]

**शामराव** : ( हंसून ) तुम्ही तरुण मंडळी भारीच उतावीळ बुवा ! काय उगीच भांडण केलंत थोडक्यावरून ! बाकी, तुम्हांला पुन्हां एक व्हायलाहि वेळ लागायचा नाहीं म्हणा ! ( किंचित् थांबून ) पण आक्का ! मला चहा हवा बुवा ! जेवणाचं होईपर्यंत निदान दोन कप तरी रिचवले पाहिजेत. अन् तुम्हीहि घ्या बरं कां !

[ सुमति व तिच्या पाठोपाठ सुलभा स्वयंपाकघरात जातात. शामराव लिहिण्याच्या टेबलाकडे वळतात. टेबल-लँप लावून टेबलाच्या खणातले काही कागदपत्र काढतात सुटकेसमधून एक मोठी आफिस-फाइल काढून आणतात. मग खुर्चीवर बसून हे सारे पाहात बसतात. त्यांची पाठ दाराकडे आहे

क्षणभराने जमना येते नावाप्रमाणे आकारानेहि ही गुजराती आहे. वयाने ती चाळीस सहज असेल, पण लहान मुलासारखा गोल, लहान चेहरा आणि तनतुकीत अंगकांति यामुळे तिच्या वयाची कल्पना येणार नाही ती एक स्वच्छ, पांढरे पातळ नेसलेली आहे; कमरेला चिलमाचा जुडगा स्पष्ट दिसतो. कपाळी कुंकू नाही. आत येऊन ती समोवार पाहाते. शामराव तिच्या नजरेस लगेच पडतात. ]

**जमना** : ( खणखणीत आवाजानें ) म्हटलं, आहांत कां झालांत कुठं फरारी ?

**शामराव** : ( दचकून पाहात ) कोण ? जमना ! ( ताडकन् उठून तिच्याजवळ येत ) जमना, तूं इथं कशा आलीस ?

**जमना :** कशी म्हणजे ? चालत. पत्ता शोधीत शोधीत.

**शामराव :** पण इथं कां आलीस तूं ?

**जमना :** मला काय भीति आहे की काय तुमची ? (किंचित् थांबून) मला तुमच्या मुलांना पाहायचं आहे.

**शामराव :** ( न समजून ) कशाला ?

**जमना :** पोराबाळांचं नांव सांगून इतके दिवस पैसे काढलेत...आणि परवां दागिने काढून घेतलेत माझ्याकडनं !

**शामराव :** (समजावणीच्या स्वरानें) हळू बोल जमना ! मी तुला सांगितलं आहे ना सगळं ? मग माझ्या घरी येण्याची काय जरूर होती ?

**जमना :** तुमच्या सारख्या फरारी माणसाचा काय भरंवसा ? कशी मी तुमच्या विश्वासांत सांपडलें, भगवान् जाणे ! इतक्या थापा मारल्यात मला ! मुलांची देखील थापच असणार !

**शामराव :** माझा धंदा फिरतीचा आहे हें तुला माहीत आहे. घरीच नसतों मी महिनान् महिना. मग तुझ्याकडे कुठून येऊं ? यांत फरारीपणाचा अन् आविश्वासाचा प्रश्न काय आला ?

**जमना :** माझ्या दागिन्यांचं काय केलंत ?

**शामराव :** (अस्वस्थ होऊन) जमना, मी कांही ते गिळून टाकले नाहींत ! वेळच्या वेळीं परत केले नाहीत तर बोलायला ये.

**जमना :** परवाची मुदत आहे—

**शामराव :** तुझ्यापेक्षां मला जास्त आठवण आहे !

**जमना :** नाही दिलेत तर ?

**शामराव :** कबूल केलेली मुदत अजून संपली नाहीं ना ? त्याच्या आंतच काय भुणभुण लावली आहेस ?

**जमना :** तुमच्यावर विश्वास उरला नाही माझा.

**शामराव :** ( चिडून, मोठ्यानें ) मग जा. बोंब मार. फिर्याद कर माझ्यावर !

**जमना :** ( तितक्याच मोठ्यानें ) हें विश्वासाचं बोलणं वाटतं तुमचं ?

**शामराव :** जमना ! माझ्या घरांत, माझ्या मुलीच्या समोर, हे शुष्क वाद नको आहेत मला ! तुला नीट बसून बोलायचं असलं तर बोल. नाहीतर चालू लाग !

**जमना** : ( मोठ्यानें ) पाहा, पाहा तरी ! दागिने हवे होते तेव्हां माझ्या रावण्या करून टिपंसुद्धां गाळलींत आणि आतां हें बोलतां ? कृतघ्न ! पण मी सांगून ठेवतें. वेळेवर दागिने मिळाले नाहींत तर—

**शामराव** : ( ओरडून ) तुला हळूं बोलतां येत नाहीं का ?

[ शामराव बोलत असतानाच, एका लहान ट्रेवर छोटी किटली आणि रिकामी कप-बशी घेऊन, सुमति सैंपाकघराच्या दाराशीं आलेली आहे. या प्रकाराचा तिला कांहींच अर्थबोध होत नाहीं. यांत्रिकपणें ती दोन्ही हात पुढें करते आणि दारातूनच बोलते. ]

**सुमति** : बाबा ! हा चहा—

[ शामराव दचकून तिच्याकडे पाहातात जमना दोघांच्याकडे आळीपाळीनें पाहाते. ]



# २

[ चार दिवसांनतर. सकाळी ९-९॥ चा सुमार.

शामराव सैपाकघरांतून येतात आणि बाहेरच्या दारानें जिना चढून वर जाऊं लागतात. तोंच जिना उतरून येत असलेले विष्णुपंत दिसतात. जिन्याच्या तबकडींत क्षणभर दोघे बोलत उभे राहतात. नंतर— ]

**शामराव** : आंत या ना, विष्णुपंत.

[ विष्णुपंत आंत येतात व कोचावर बसतात. हे घरमालक. गृहस्थ पेन्शनींत आहेत; पण म्हातारपणाची कळा अंगावर किंवा मुखावर अजून आलेली नाहीं. डोक्याला टक्कल, चेहरा तुकतुकीत. एक साधें धोतर व रेघांचा सिंगल कफचा शर्ट अंगांत आहे. ]

**विष्णुपंत** : दोन चार दिवस झाले, तुम्हीं घरीं असल्याचं समजलं. पण मी मुद्दाम आलों नाहीं.

**शामराव** : पण मी तुमच्याकडेच यायला निघालों होतों.

**विष्णुपंत** : भाड्यासंबंधीं काय करतां आहांत ?

**शामराव** : तें बोलायलाच तर येत होतों.

**विष्णुपंत** : आतां ऐकण्यासारखं कांहीं राहिलेलं नाहीं.

**शामराव** : तुम्ही पाहताच आहांत विष्णुपंत ! माझं आयुष्य हें असं प्रवासी. पहिल्या तारखेला पैसे यायला मला नोकरी नाहीं कीं तुमच्यासारखं पेन्शन् नाहीं. माझ्यासारख्याच्या बिनभांडवली धंद्यांत ही अशी अडचण यायचीच.

**विष्णुपंत** : शामराव, गेल्या आठ महिन्यांत तुम्हांला एकदांहि सवड झाली नाहीं ? हें तुम्ही म्हणा अन् मी ऐकतों !

**शामराव** : असं नाहीं विष्णुपंत ! हाताशीं आलेले पैसे इतके अपुरे होते, कीं माझा नाईलाज झाला ! पोराबाळांना उपाशीं ठेवून तर कांहीं करतां येत नाहीं ?

**विष्णुपंत :** आम्हीं याच विचारानं गय करतों. पण तुमचा हा घरचा थाटमाट पाहून तुमच्या बोलण्यावर कितपत विश्वास ठेवावा हा प्रश्नच आहे.

**शामराव :** अहो, माझ्या धंद्याच्या दृष्टीनं हा हत्ती मला पोसावा लागतो ! पण याचा काय उपयोग आहे ? मुलांना भूक लागली म्हणजे कांहीं टेबल-खुर्चीचा तुकडा मोडून देतां येत नाहीं.

**विष्णुपंत :** तुमच्या अडचणी खऱ्याहि असतील. पण दुसऱ्यानं किती थांबावं यालाहि कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं ?

**शामराव :** विष्णुपंत, तुमचा मी अतिशय ऋणी आहे. तुमच्यासारखा घरमालक कांहीं मिळायचा नाही. तुम्हीं आहांत म्हणून माझी अब्रू राहिली आहे. तुमचे उपकार कसे फेडावेत—

**विष्णुपंत :** भाड्याचा हिशोब चुकता करून.

**शामराव :** विष्णुपंत, सवड असून मी पैसे दिले नाहींत असं तुम्हांला सुचवायचं आहे कां ?

**विष्णुपंत :** तुम्हांला कधीच सवड नसते हें मला कबूल आहे.

**शामराव :** काय टोमणे मारतां आहांत, विष्णुपंत !

**विष्णुपंत :** हें पाहा शामराव ! तुम्ही आज तीन वर्षं माझ्या घरांत राहात आहांत. अन् हा कांहीं पहिलाच प्रसंग नाहीं. केवळ तुमच्या मुलींच्याकडे पाहून मीं इतके दिवस गप बसलों.

**शामराव :** माझ्या मुली पाहण्यासारख्या आहेत खऱ्या !

**विष्णुपंत :** शामराव ? काय बोलतां आहांत तुम्ही ?

**शामराव :** ( हंसत ) तो नव्हता माझा उद्देश, विष्णुपंत ! मी सहजपणं म्हणालों. एखाद्या संस्थानिकाच्या घरांत शोभून दिसतील अशा आहेत माझ्या मुली ! पण मी असा दुर्दैवी ! कोणीहि डोळा उचलून त्यांच्याकडे पाहावं अशी स्थिति झाली आहे !

**विष्णुपंत :** माझ्या म्हणण्याचा विपर्यास करतां आहांत तुम्ही !

**शामराव :** रागवायचं कारण नाहीं विष्णुपंत ! मनुष्यस्वभाव आहे हा. आतां तुमचंच पाहा ना ! या वयांत तुम्ही दुसरं लग्न केलंत. लोक कांहींहि म्हणोत. मला मात्र यांत माणुसकीच दिसते. माणसाच्या गरजा—

**विष्णुपंत :** ( रागानें ) आपण विषयाला धरून बोललेलं बरं !

**शामराव :** बरं, तसंच करूं या. भाड्याचा हिशोब करून टाकूं आणि मग बोलत बसूं. किती पैसे आहेत बाकी ?

**विष्णुपंत :** आठ महिन्यांत तुमच्याकडून एक पैहि आलेली नाहीं.

[ शामराव उठून टेबलाच्या खणातून नोटा काढतात आणि पाहून विष्णुपंताच्या हातीं देतात. विष्णुपंत काळजीपूर्वक एकेक नोट तपासून मोजतात. ]

**शामराव :** हे तीनशें रुपये आहेत. आतां फक्त दोनच महिन्याचं भाडं राहिलं. तेंहि शक्य तर या महिन्यांतच देईन.

**विष्णुपंत :** ( नोटा मोजून, आश्चर्यानें ) या तर अडीचशेंच्याच नोटा आहेत !

**शामराव :** ( शांतपणें ) हो. अडीचशें आणि पन्नास, असे तीनशें झाले.

**विष्णुपंत :** म्हणजे ? पन्नास रुपये केव्हां दिलेत तुम्ही ?

**शामराव :** वाः विष्णुपंत ! मी पावतीची फिकीर करीत नाहीं, म्हणून काय झालं ?

**विष्णुपंत :** शामराव, तुम्ही कोणाला पैसे दिलेत.

**शामराव :** तुम्हांला मिळाले नाहीत पैसे ? काल संध्याकाळींच तर दिले. म्हणजे आतां गहजब झाला !

**विष्णुपंत :** पुन्हां आपलं तेंच ! मी विचारतों, कोणाजवळ दिलेत पैसे ? मला दिलेत आणि रात्रभरांत माझं डोकं फिरलं, असं तर नाहीं ना ?

**शामराव :** ( शांतपणें ) तुमच्या मुलाजवळ दिले. त्यानंतर आणखी हाताशीं आले म्हणून हे आतां देत आहें.

**विष्णुपंत :** वसंतजवळ दिले पैसे ? साफ खोटं आहे !

**शामराव :** ( रागानें ) काय खोटं आहे, विष्णुपंत ?

**विष्णुपंत :** थांबा. मी वसंतालाच बोलावून आणतों.

**शामराव :** तुम्ही कशाला ? मीच बोलावतों. ( जिन्यांतून एक हांक मारीत ) वसंत, ए वसंत ! जरा खालीं ये पाहूं. ( तिथूनच, विष्णुपंतांना उद्देशून ) संध्याकाळीं वसंत आला होता अनायासं, म्हणून त्याच्याजवळ दिले. आम्हांला तुम्ही अन् तुमचा मुलगा, दोघंहि सारखेच !

[ विष्णुपंत उठून उभे आहेत. वसंत येतो. ]

**शामराव :** ( दारांतच ) वसंत, मी तुला पन्नास रुपये दिले ना ?

**वसंत :** ( भांबावून ) म्हणजे ?

**शामराव :** अरे, काल संध्याकाळीं नाहीं का दिले ?

**वसंत** : ( चाचरत ) हो.

**विष्णुपंत** : ( एकदम, खेकसत ) कुठे आहेत ते पैसे !

**वसंत** : मी—मी—

**विष्णुपंत** : काय केलंस त्या पैशाचं, बोल ?

**वसंत** : मी—

**विष्णुपंत** : मी-मी काय करतोस ? माझ्या प्रश्नाचं उत्तर दे.

**शामराव** : ( मध्येंच ) अहो विष्णुपंत ! असं काय करतां ? घराच्या बाहेर तर गेले नाहींत ना पैसे ?

**विष्णु** : या कार्ट्यांचा काय भरंवसा आहे ? उडवूनसुद्धां टाकले असतील !

**शामराव** : तरीहि काय झालं ? तुमचाच मुलगा आहे. अन् एकुलता एक ! थोडेसे पैसे त्यानं स्वतःसाठीं खर्च केले तर त्यांत येवढं बिनसायला काय झालं ?

**विष्णुपंत** : शामराव, तुम्ही मध्यें बोलूं नका ! हा नुसता पैशाचा प्रश्न नाहीं, तत्त्वाचा प्रश्न आहे ! येवढा घोडा झाला आहे...पण दिडकी कमवायची अक्कल नाहीं ! पैशाच्या बाबतींत हा बेजबाबदारपणा मी मुळींच सहन करणार नाहीं !

**शामराव** : ( शांतपणें ) ठीक आहे, विष्णुपंत ! पण माझ्या घरांत, माझ्या मुलींच्या समोर, हा देखावा न झाला तर बरं. वसंत कांहीं लहान नाहीं. घरांतलं कर्तेपण घ्यायचं त्याचं वय आहे. खरं म्हणजे या साऱ्या जबाबदाऱ्या तुम्ही त्याच्यावर टाकून स्वस्थ हरि-हरि म्हणत बसायला पाहिजे. अर्थात् हें सांगण्याची मला जरूर नाहीं—

**विष्णुपंत** : मग कशाला बोलतां आहांत ?

**शामराव** : आमच्यासमोर येवढ्या मोठ्या मुलाला वागविण्याची ही तऱ्हा पाहून राहवलं नाहीं. तुमच्या घरांत येऊन तर बोललों नाहीं ना ? तें जाऊं द्या. तुम्हांला तीनशें रुपये पोचले ना ?

**विष्णुपंत** : ठीक आहे !

[ विष्णुपंत रागानें वसंतकडे पाहतात. त्यांच्या मनांत कांहीं बोलायचें आहे; पण ते बोलत नाहींत. तसेच तावातावानें ते निघून जातात. इतका वेळ वसंत चोरट्या-सारखा उभा आहे. तो आतां पुढें येतो. ]

**वसंत** : बाबा ! हें कांहीं बरं झालं नाहीं.

**शामराव** : (मोठमोठ्यानें हंसत) गाढव आहेस तूं वसंत ! तुला कांहीं कळत नाहीं !

**वसंत** : पण हें काय केलंत तुम्ही ?

**शामराव** : ही युक्ति केली नसती मी, तर विष्णुपंतांना सुनवून घ्यायचा मोका कसा मिळाला असता ? तुला ज्या तऱ्हेनें ते वागवतात तें मला मुळींच पसंत नाहीं. येवढी मोटी इस्टेट आहे; पण तुला एखाद्या चोरासारखं वावरावं लागतं घरांत ! अन् तूंहि बावळट आहेस अगदीं !

**वसंत** : पण बाबा—

**शामराव** : पण काय ? हे पन्नास रुपये राहिले नसते तर तुझ्या हातीं एक दिडकी तरी आली असती का ?

**वसंत** : ( विश्वास न वाटून ) हे पैसे तुम्ही मला देणार आहांत ?

**शामराव** : शंका आहे कीं काय ? ( चटकन् उठून, टेबलाच्या खणांतील पैसे आणून त्याच्या हातीं देतात. ) घे. तुला देण्यासाठींच तर मी युक्ति केली.

**वसंत** : ( नोटांकडे पाहात ) काय करूं मी याचं ?

**शामराव** : काय वाटेल तें कर. विष्णुपंतांनीं विचारलं तर सांग खर्च झाले म्हणून. रागावले तर गप बैस...अन् ताकद असली तर तुझ्या हक्काची जाणीव त्यांना करून दे. हा असा बावळटपणा किती दिवस करणार आहेस तूं ?

**वसंत** : मी एक सूट शिववतों—

**शामराव** : ठीक आहे. कमी पडले तर मला सांग. मी देईन आणखी. अगदीं तुला भेट म्हणून.

**वसंत** : ( खूष होऊन ) बाबा ! नाहातरं मी असं करतों. सुलभासाठीं कांहींतरी खरीद करतों.

**शामराव** : ( हंसत ) अलिकडे तुला अक्कल यायला लागल्यासारखी दिसते आहे ! गाढवा, कविता करून का एखाद्या मुलीचं प्रेम मिळवितां येतं ? बरं, लवकर समजलं तुला !

**वसंत** : आतां नाहीं कविता करणार. सुलभानंच सांगितलंय् तसं.

**शामराव** : ( हंसत ) छान !

**वसंत** : पण बाबा, मी हे पैसे खर्च केले अन् समजा, कांहीं झालं...तर तुम्ही मला मदत कराल ना ?

**शामराव** : अवश्य ! पण वसंत, मलाहि तुझी मदत हवी आहे. मला पांच हजार रुपयांची अतिशय गरज आहे यावेळीं.

**वसंत** : ( घाबरून ) बापरे ! मी कुठून आणूं येवढे पैसे ? हेच तर मुळीं तुम्ही दिलेत !

**शामराव** : ( त्याच्या घाबरटपणाचें हसूं येऊन ) बरं, जाऊं दे ! पण काय रे वसंत ? तुझ्या आईचे दागिने असतील ना ?

**वसंत** : आहेत तर ! ताई मटकावून बसली आहे सगळे !

**शामराव** : वास्तविक, ताई म्हणजे तुझी नुसती नांवाची आई. या दागिन्यावर तिचा हक्क कांहीहि नाही. वाटलं तर विष्णुपंतांनी तिला नवे दागिने करवून द्यावेत. पण हे दागिने खरं म्हणजे तुझ्या बायकोच्या अंगावर असले पाहिजेत. आणि तुझी बायको येईपर्यंत त्या दागिन्यांची मालकी तुझी आहे !

**वसंत** : मलासुद्धां असंच वाटतं बाबा !

**शामराव** : ( सहजपणें ) ताई कुठें ठेवते दागिने ?

**वसंत** : तिच्या कपाटांत.

**शामराव** : तुला नीट माहीत आहे ?

**वसंत** : मी काय उगीचच सांगतोंय् ? माझ्या डोळ्यांनीं पाह्यलं आहे मी ! अन् एखादे वेळीं कपाटाची चावी ताईच्या ड्रेसिंग टेबलावरच पडलेली असते. बावळट आहे तशी ती. तिचं लक्षच नसतं घरांत !

**शामराव** : ( हसूं रोधण्याचा प्रयत्न करीत ) वसंत, इकडे ये तुला एक गंमत सांगतों.

[ त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्याला हळुहळू कांहीं सांगतात. असेच कुजबुजत दोघेजण दारापर्यंत जातात. वसंत प्रथम जरा दचकतो. मग माना डोलवतो. शामराव त्याच्याशी बोलत जिन्याच्या कांहीं पायऱ्या चढून वर जातात. कांहीं वेळ दोघेहि दिसेनासे होतात. क्षणभरानें शामराव जिना उतरून पुन्हा खालीं येत असलेले दिसतात.

[याच वेळीं दारावरील नावाची पाटी वाचीत उभे असलेले एक गृहस्थ दिसतात. हे परशुरामपंत. पंडितचे वडील. उंच आणि मजबूत बांध्याचे. वय पन्नाशीच्या पुढें, परंतु पिकलेल्या केसांशिवाय वृद्धत्वाची कांहीहि खूण त्यांच्या अंगावर नाहीं; त्याचा आवाजहि खणखणीत आहे हे लवकरच कळून येईल! पिवळसर रंगाचा रेशमी सूट, विजार आणि लांब कोट, डोक्याला जरीचा शुभ्र फेटा, तसलेंच उपरणें खांद्यावर, पायांत पांढरे मोजे व काळा बूट; हातांत चांदीच्या मुठीची काठी, असा त्यांचा पेहराव आहे. चष्मा नाहीं. मिशा झुपकेदार. पाहताच दबदबा वाटावा असं व्यक्तिमत्व. त्यांच्या मागें आणखी एक साध्या पोशाखांतील व्यक्ति उभी आहे.]

**परशुरामपंत** : हो...हेंच घर! (शामरावांना जिन्यावरून येतांना पाहून) शामराव इथेंच राहातात ना?

**शामराव** : (पुढें होऊन) हो. आंत या ना आपण!

**परशुरामपंत** : तुम्हीच शामराव का? बरं झालं.

[ते बरोबरच्या गृहस्थाला खूण करतात. तो निघून जातो.]

**शामराव** : त्यांनाहि यायला कांहीं हरकत नाहीं.

**परशुरामपंत** : नको. ते थांबतील खालीं.

[परशुरामपंत पुढें येऊन कोचावर बसतात. त्यांच्या मागण्यावरून शामरावहि बसतात.]

**परशुरामपंत** : माझं नांव परशुरामपंत गोडबोले. पंडित हा माझा मुलगा. इतका प्रस्ताव केल्यानंतर आणखी कांही सांगायची जरूर नाहीं.

**शामराव** : (उठून, आनंदानें) वाः वाः! अचानक योग आला भेटीचा! (गडबडीनें सैंपाकघराच्या दाराजवळ जाऊन) ए आक्का, मुलं! हें पाहा कोण आलंय्. जरा बाहेर या पाहूं. (दोघी बाहेर येतात.) आक्का, हे पंडितचे वडील. ही माझी मोठी मुलगी, सुमति; आणि ही धाकटी, सुलभा.

[दोघी त्यांना वाकून नमस्कार करतात.]

सुधीर कुठं गेलाय् ग?

**परशुरामपंत** : असूं द्या. कांहीं बोलावण्याची जरूर नाहीं.

**शामराव** : आपण काय घेतां? चहा, कॉफी?

**परशुरामपंत** : कांहींच नाहीं. (किंचित् थांबून) मुलींना आंत जाऊं दे.

[परशुरामपंतांचें बोलणें अत्यंत सभ्यपणाचें असूनहि हुकमीपणाचें आहे. त्यामुळें आग्रहाचा गोंधळ न होतां, दोघीहि आंत जातात. त्या गेल्यावर—]

**परशुरामपंत** : मला आपल्याशीं कांहीं बोलायचं आहे आणि तें मुलींच्या कानीं न पडलेलं बरं. इथं बोलतां येत नसेल तर आपण कृपा करून माझ्याबरोबर येण्याची तसदी घ्या. मी हॉटेलांत उतरलों आहे तिथं बोलूं.

**शामराव** : कांहीं आवश्यकता नाहीं. आपण अगदीं मोकळेपणानं बोला. मी एका मिनिटांत सांगून येतों आंत.

[ शामराव सैपाकघरांत जाऊन येतात. मग बाहेरचे दार ओढून आंतून बंद करतात व कोचाजवळ येऊन एका खुर्चीवर बसतात. ]

**शामराव** : ( हंसून ) बोला आतां.

**परशुरामपंत** : आपण घेतलेल्या तसदीबद्दल मी अतिशय आभारी आहे. ( किंचित् थांबून ) स्पष्टपणें बोललों तर चालेल ना ?

**शामराव** : अगदीं निःसंकोचपणें बोला आपण. माझी कांहीं हरकत नाहीं.

**परशुरामपंत** : तुमचा साक्षात् संबंध येईल कदाचित्. म्हणून विचारून घेतलं. माझ्या कल्पनेप्रमाणं मी सत्य तेंच बोलणार आहे. पण माणसाची चूक होऊं शकते. माझं एखादं विधान चुकीचं असल्यास लगेच माझ्या निदर्शनास आणा.

**शामराव** : ( हंसून ) बरं.

**परशुरामपंत** : माझा मुलगा पंडित—

**शामराव** : माझ्या कल्पनेप्रमाणं मेडिकलच्या शेवटच्या वर्षाला आहे—

**परशुरामपंत** : गेलीं पांच वर्षं तो शेवटच्याच वर्षांत आहे. प्रस्तुत गोष्ट येवढीच कीं तो तुमच्याकडे नेहमीं येत असतो.

**शामराव** : हो. सुमतीची त्याची मैत्री आहे.

**परशुरामपंत** : तो आपल्या घरीं केव्हांहि येऊं शकतो आपण इथं नसतांना सुद्धां ?

**शामराव** : मी कधींच आडकाठी केली नाहीं.

**परशुरामपंत** : त्यालाच, का कोणालाहि ?

**शामराव** : म्हणजे ?

**परशुरामपंत** : पंडितच आपल्या घरीं येऊं शकतो, का इतर कोणीहि आलं तर त्यालाहि आपल्याकडे मुक्तद्वार आहे ?

**शामराव** : कोणी आलं तर माझ्या मुली पाहून घेतील. त्या मोठ्या आहेत.

**परशुरामपंत** : म्हणूनच विचारतों.

**शामराव** : आपल्याला काय सुचवायचंय् तें समजलं मला. मी इतकंच सांगतों कीं माझ्या मुली स्वतंत्र आहेत आणि माझा त्यांच्यावर पूर्ण विश्वास आहे.

**परशुरामपंत** : माझाहि आहे. पण विशेष कांहीं उद्देश किंवा दिशा असल्याशिवाय या स्वातंत्र्याचा उपयोग नाहीं. विश्वासाचा मुद्दा सध्यां अप्रस्तुत आहे.

**शामराव** : तो कसा ?

**परशुरामपंत** : पंडित तुमच्याकडे येतो. मोकळेपणानें घरांत वावरतो. सहज म्हणा, किंवा सहवासानं म्हणा, त्यांच्यांत आणि तुमच्या मुलींत परस्पर आपुलकी उत्पन्न होणं अगदी शक्य आहे. त्यांत संकोच, दडपण किंवा विरोध यांचा पूर्ण अभाव. त्यामुळं ही आपुलकी आणखी वाढीला लागणार.

**शामराव** : खरं आहे.

**परशुरामपंत** : या संबंधाचा शेवट काय होणार ? लग्न, निराशा किंवा नुसती लोकनिंदा हे संभाव्य शेवट आहेत. मघां मी उद्देश किंवा दिशा यांविषयीं बोललों तें या अर्थानं. यांपैकीं कोणता शेवट आपल्याला अभिप्रेत आहे ?

**शामराव** : आपला प्रश्न चमत्कारिक आहे. मी असा कांहींच विचार केला नाहीं. हा संबंध जडला योगायोगानं. कोणताहि हेतु मनांत धरून मी तो वाढूं दिला नाहीं.

**परशुरामपंत** : माझ्या प्रश्नाचं उत्तर द्यायला मी तुम्हांला मदत करतों. मी म्हटलं, तुम्हांला लोकनिंदा अभिप्रेत आहे—

**शामराव** : आपण एक सभ्य गृहस्थ आहांत—

**परशुरामपंत** : तुमच्याबद्दल माझ्या मनांत तीच इच्छा आहे—

**शामराव** : मग आपला हा आरोप—

**परशुरामपंत** : खोटा असला तर तो मोठ्या आनंदानं मी परत घेईन. वस्तुस्थिति अशी आहे कीं, या संबंधाबद्दल लोकचर्चा बरीच चालू आहे. अशा चर्चेत कुत्सितपणा असणार हें उघड आहे. हें थांबविण्याचा आपण प्रयत्न केला आहे ? या निंदेंत माझ्या मुलाप्रमाणं आपली मुलगीहि सांपडली आहेच.

**शामराव** : माझ्या मुलीवर जोंपर्यंत माझा विश्वास आहे, तोंपर्यंत मी गटारगप्पांना भीक घालणार नाहीं.

**परशुरामपंत** : मला असं वाटतं कीं, एखादा संबंध इष्ट नसेल तर तारुण्यावर असा विश्वास टाकतां येणार नाहीं. विस्तवाजवळ लोणी वितळणारच, अशी

जुनी एक म्हण आहे. मानसशास्त्राच्या दृष्टीनं ती अगदीं खरी आहे. संस्कार चांगले असले तरी नैसर्गिक प्रभाव हा फारच बलवत्तर असल्यानं, या शक्तीपुढं संस्कारहि ठिसूळ होऊं लागतात. विश्वासाचा मुद्दा अशा रीतीनं बाजूला झाल्यावर लोकनिंदेच्या मुद्याकडे वळायला हरकत नाहीं.

**शामराव** : (हंसून) आपण उलटतपासणी आणि व्याख्यान अशा दोन्ही गोष्टी एकाच वेळी चालवल्या आहेत !

**परशुरामपंत** : उभी हयात न्यायाधिशाचं काम करण्यांत गेली आहे, तेव्हां नाइलाज आहे माझा. लोकनिंदेची आपल्याला पर्वा नाहीं असं आपण म्हणालांत. श्रीमंती किंवा सत्ता, यांच्या जोरावरच मनुष्य लोकमताविषयीं बेपर्वा राहूं शकतो. यांपैकी आपल्याजवळ कोणती शक्ति आहे ? कोणतीहि नसली तर, या निंदेची झळ आपल्या मुलीला लागून तिचं भवितव्य काय होईल याचा विचार आपल्या मनांत येतो का ?

**शामराव** : आपल्याप्रमाणं विचार करण्याची माझ्या अंगीं शक्ति नाहीं कीं विद्वत्ता नाहीं. पण म्हणून लोकनिंदा मला अभिप्रेत आहे असं आपण कसं म्हणूं शकतां ? कोणत्या बापाला आपल्या सोन्यासारख्या मुली लोकनिंदेला बळी पडलेल्या पाहवतील ?

**परशुरामपंत** : माझीहि भावना तशीच आहे. म्हणूनच या संबंधाचा शेवट आपण शक्य तितक्या लवकर आणि समजूतदारपणानं करावा असं मला वाटतं. तेव्हां आपल्याला लोकनिंदा नको आहे हें निश्चित. मग आपल्याला आपल्या मुलीच्या पदरी निराशा बांधावयाची आहे असं मी म्हणूं ?

**शामराव** : आपल्याप्रमाणं मीहि स्पष्ट बोललों तर चालेल ना ? माझ्या मुलीचं आपल्या मुलावर प्रेम आहे. ती अबोल आहे पण तिच्या भावनेची खोली मी जाणतों. पंडितचं मनहि तिच्यावर बसलं आहे अशी माझी समजूत आहे. पण ती जर चुकीची असेल, किंवा त्याचं मन फिरलं असेल, किंवा आपण या संबंधाला विरोध करणार असाल आणि पंडितहि तुमच्या आज्ञेप्रमाणं वागणार असेल, तर तिची निराशा होईल हें उघड आहे. प्रेम बसायला कारण लागत नाहीं, मोडायला कारण लागतं. तें कारण तुम्ही उत्पन्न करणार असाल तर मी कांहीं विरोध करूं शकत नाहीं. आपण हवं तें करा.

**परशुरामपंत** : पंडितचं लग्न अगोदरपासूनच ठरलेलं आहे, उभयपक्षीं डोळे उघडे ठेवून ठरलेलं आहे, आणि केवळ त्याच्या नापास होण्यामुळं तें आज चार-पांच वर्षं लांबणीवर पडलेलं आहे ही गोष्ट तुम्हांला माहीत आहे अशी माझी समजूत आहे.

**शामराव** : मला माहीत असो कीं, नसो. त्याचा इथ काय संबंध ?

**परशुरामपंत** : संबंध असा. ही गोष्ट जर आपल्याला माहीत होती—असं आपण गृहीत धरूं—तर हे संबंध वाढूं न देण्याची दक्षता आपण घ्यायला हरकत नव्हती. पंडितचा बेजबाबदारपणा मी नाकारीत नाही. पण त्यानं तरुण म्हणून एक चूक केली असली तरी आपण, आपल्या मुलीच्या हितासाठीं तरी, तिला वेळीच सावध करणं जरूर होतं. म्हणजे मग मी म्हणतों तसा निराशेचा प्रसंग येताच ना.

**शामराव** : ( उपरोधिकपणें ) आपण बऱ्याच गोष्टी गृहीत धरून चालला आहांत !

**परशुरामपंत** : बरं ! मग तुमच्या माहितीसाठीं मी कांही तपशील देतों. पंडितचं लग्न ज्या मुलीशीं ठरलं आहे ती चांगली आहे, कुलीन आहे, सधन आहे. दीडवर्षापूर्वी ती डॉक्टरीण झाली. आमच्या दोन्ही घराण्यांचे संबंध फार जुने आहेत, जिव्हाळ्याचे आहेत. दोघांना बरोबरच विलायतला पाठवायचं ही पहिली कल्पना होती. आतां त्या मुलीच्या वडलांनीं एक खाजगी हॉस्पिटल बांधलं आहे. मी दवाखाना बांधतों आहे. पंडित येऊन दाखल झाला कीं, हें चित्र पुरं होणार आहे.

**शामराव** : मोठ्या आनंदाची गोष्टी आहे !

**परशुरामपंत** : आपल्या या भावनेबद्दल मी आभारी आहे. परंतु प्रश्न आपल्या आनंदाचा नसून आमच्या आनंदाचा आहे. आणि त्यांत बिघाड होऊं नये अशी साहजिकच आमची इच्छा आहे.

**शामराव** : आपण अशा रीतीनं बोलत आहांत की जणूं यांत माझा कांहीं अपराध आहे ! आपल्यासारख्या सद्‌गृहस्थाशीं उद्धटपणं बोलणं हें माझ्या सभ्यतेला सोडून आहे ! मी येवढंच म्हणतों कीं, दोन जाणत्या तरुणांच्या डोळस भावनेच्या आड येण्याची मला जरूर वाटत नाहीं. आपली मतं वेगळी असण्याचा संभव आहे ! आपण आपल्या मुलाला कां आवरलं नाहीं ?

**परशुरामपंत** : आपल्या प्रत्येक विधानाचं मर्म मी समजलों. त्याचं विश्लेषण करायला यावेळीं वेळ नाहीं, आणि तें प्रस्तुतहि नाहीं. मुलांना आवरण्याचा जो प्रश्न आहे, तो मानसशास्त्रीय आहे. मुलं मोठीं झालीं म्हणजे धाकदडपण इत्यादि उपाय निरुपयोगीच नव्हे तर घातुक ठरतात. पंडितला मी नुसती सूचना केली तरी तेवढ्यानं तो इतका बिथरला कीं, गेल्या वर्षांत घरींच आला नाहीं. असं होतं.

**शामराव** : आपल्याला आपला मुलगा आवरतां येत नाहीं त्याला मी काय करूं ?

**परशुरामपंत** : आपण गैरसमज करून घेत आहांत ! माझ्या मुलाला आवरण्यासांठीं आपली मदत घ्यावी म्हणून मी इथं आलों नाहीं. आपल्याला येवढंच सुचवीत होतों कीं, आपल्याप्रमाणं जाणूनबुजून—अथवा अजाणतां—डोळे मिटून चालण्याची मला संवय नाहीं. माझ्या मुलाला मी आवरलं नाहीं असं जें आपण सूचित केलंत तें चुकीचं आहे, यवढंच मला दाखवायचं होतं. आणि त्याबरोबर ही बाब नाजूक आहे हेंहि मला सांगावयाचं आहे. या प्रकरणाला एवढीच बाजू असती तर मी इथं येण्याची तसदी घेतली नसती. हें आपल्या आतां तरी ध्यानीं आलं आहे का ?

**शामराव** : इथं येण्यांत आणि हें सारं मला सांगण्यांत आपला काय उद्देश आहे, हें अजून तरी मला समजलं नाहीं !

**परशुरामपंत** : तसा मीहि थोडा घोटाळ्यांत पडलों आहे. ( किंचित् थांबून ) या संबंधांतून उत्पन्न होणारे तीन संभाव्य परिणाम — लोकनिंदा, निराशा किंवा लग्न. पैकीं, लोकनिंदा आपल्याला अभिप्रेत नाहीं आणि निराशा आपल्याला साहजिकच नको असणार.! परंतु, आपल्याला लग्न तरी अभिप्रेत आहे का ? या प्रश्नाचं उत्तर दिलंत तर बराच घोटाळा उलगडेल.

**शामराम** : आपल्या प्रश्नाचा अर्थ आपल्याला तरी कळला आहे का ?

**परशुरामपंत** : आपण वेगळ्या रीतीनं उत्तर शोधण्याचा प्रयत्न करूं. ( खिशांतून काळजीपूर्वक एक पत्र काढीत ) मजजवळ हें एक पत्र आहे. ( किंचित् थांबून ) या पत्रांत लिहिलं आहे कीं माझा मुलगा इथं — म्हणजे मुंबईत — एका मुलीच्या नादीं लागलेला आहे. या नादाची

तपशीलवार आणि लांबलचक वर्णनं या, व गेल्या दोन महिन्यांत आलेल्या दहा-वीस पत्रांत आहेत.

**शामराव** : कोणीतरी दुष्ट हेतू मनांत धरून हीं पत्रं लिहिलीं असलीं पाहिजेत !

**परशुरामपंत** : पत्राच्या खालीं जी सही आहे ती अर्थात् 'एक हितचिंतक' म्हणून आहे. परंतु, आपण म्हणतां तसंच मला वाटतं; कारण हीं पत्रं पंडितच्या वाग्दत्त वधूच्या नांवानं आलेलीं आहेत.

**शामराव** : बापरे ! कमालच झाली !

**परशुरामपंत** : या पत्रांच्या मागें योजना दिसते. पहिला खडा टाकून तो लागतो आहे हें पाहातांच पुढील पत्रांतून कांहीं सूचक विधानें टाकलेलीं आहेत. त्यापैकीं एक असं आहे कीं पंडितचं या मुलीशीं लग्न होईलच असं नाहीं. ही मुलगी म्हणजे—काय नांव तिचं ?—सुमति. अर्थात् नादीं लागण्याचा शब्दप्रयोग सोडून द्या.

**शामराव** : संदर्भावरून तरी असंच वाटतं. पंडितचं आमच्याकडे जाणं-येणं विशेष आहे. दुसरी कोणी आणखी मुलगी असली तर मला कल्पना नाहीं ! पण पंडितच्या स्वभावावरून तसं वाटत तर नाहीं.

**परशुरामपंत** : तुमच्या या विधानाबद्दल मी अतिशय आभारी आहे. मघाचा आपला प्रश्न सोडवायला त्याची बरीच मदत होईल. माझा प्रश्न होता : आपल्याला पंडितचं आणि आपल्या मुलीचं लग्न अभिप्रेत आहे का ?

**शामराव** : पुन्हां तोच चमत्कारिक प्रश्न ! ज्या कोणी हीं पत्रं लिहिलीं असतील त्याला कुठल्याच संबंधाचं सुखदुःख नसेल. माझ्या उत्तरानं हा प्रश्न कसा सुटणार आहे ?

**परशुरामपंत** : नाहीं सुटणार का ? आपण प्रयत्न करून पाहूं. या पत्रांमधून आणखी एक सूचना आहे. या मुलीचा बाप...म्हणजे आपण, असं म्हणूं ना ?— सध्यां एका पैशाच्या संकटांत आहे !

**शामराव** : बराच माहीतगार दिसतो आहे हा पत्रलेखक !

**परशुरामपंत** : असं ना ? पण या सूचनेंतला एक ध्वनि आपल्या लक्षांत आला का ?

**शामराव** : ध्वनि ? नाहीं बुवा !

**परशुरामपंत** : ध्वनि स्पष्ट आहे. या मुलीच्या बापाला जर पैसे मिळाले तर ह्या

प्रकरणाचा कदाचित् शेवट होईल. (एकदम) आपल्याला किती पैसे हवेत ?

**शामराव** : (दचकून) आपल्या या विधानाचा अर्थ काय होतो हें आपल्याला ठाऊक आहे ?

**परशुरामपंत** : मला हा पत्रलेखक काय किंवा आपण काय, दोन्ही सारखेच !

**शामराव** : आपलं हें विधान फारच भयंकर आहे ! केवळ आपला दर्जा आणि पंडितचा संबंध लक्षांत घेऊन मी आपलं सगळं बोलणं शांतपणं ऐकून घेतलं आहे. परंतु, आपल्याला जर याच तालासुरांत यापुढं बोलायचं असेल, तर बोलणं बंद करून आपण यावं, अशी मला नाईलाजानं विनंती करावी लागेल !

**परशुरामपंत** : असं कां ? (किंचित् थांबून) पण आपण कांहीं पैशाच्या संकटांत आहांत हें खरं ना ?

**शामाराव** : मी आपल्याकडे पैसे मागायला तर कधीं आलों नाहीं ना ? मग माझ्या संकटाची चिंता आपण कां करतां ?

**परशुरामपंत** : आपण माझ्याकडे आलां नाहीं तेंच संयुक्तिक आहे. कारण तसे माझ्याकडून पैसे मिळण्याची शक्यता नव्हतीच. या मार्गानें मात्र ती शक्यता उत्पन्न होते. एक तर या पत्रांचा परिणाम आमच्या मुलीच्या मनावर अपेक्षेबाहेर झाला. ती प्रकृतीनं जरा दुबळी आहे आणि, मुली सामान्यतः असतातच तशी, हळवी, भावनाशील आहे. या पत्रांनीं तिनं असा कांहीं मानसिक धक्का घेतला आहे कीं, तिच्या सुरक्षितपणाविषयीं आम्हां सर्वांना मोठीच चिंता उत्पन्न झाली आहे.

**शामराव** : तें खरंहि असेल...कदाचित् स्वाभाविक असेल. मला हें सांगण्याची जरूर ?

**परशुरामपंत** : आपण 'स्वाभाविक' शब्द वापरलात ना ? मी तेंच म्हणतों. या परिणामाची जाणीव पत्रलेखकाला निश्चित होती. या मुलीसाठीं, आणि एकंदर ही सगळी भानगड मिटविण्यासाठीं, आम्ही या फाशांत साहजिकच सांपडूं याचीहि कल्पना या पत्रलेखकाला आहे. पैसे काढण्यासाठीं टाकलेला हा डाव हुकमी आहे.

**शामराव** : आपल्या बुद्धिमत्तेची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे ! या सर्व प्रकरणाचं आपण केलेलं विश्लेषणहि जितकं सूक्ष्म तितकंच मनोरंजक आहे. मला आतां एकच गोष्ट समजावून सांगा... हें सगळं इथं येऊन मला सांगण्याचा उद्देश काय? माझ्याकडून आपल्याला काय साह्य हवं आहे?

**परशुरामपंत** : गुन्ह्याच्या उलट–सुलट सुनावणींतून सुसंगत मुद्दे शोधून काढणं हा माझा धंदाच आहे. तेव्हां त्याबद्दल आपण माझी तारीफ करण्याची आवश्यकता नाहीं. आपलं साहाय्य मला येवढंच हवं आहे कीं, हे मुद्दे मांडून झाले म्हणजे न्यायाधिशाला शिक्षा सुनवावी लागते. त्या शेवटच्या पायरीपर्यंत आपण मला जायला लावूं नये.

**शामराव** : आपण मागच्याच वळणावर पुन्हां चालला आहांत! माझा काय संबंध आहे इथं?

**परशुरामपंत** : या पत्रांचा लेखक कोण आहे हें शोधून काढलं म्हणजे त्याच्यावर 'ब्लॅक्मेल' चा आरोप ठेवणं फारसं कठीण नाहीं, आणि मग शिक्षाहि अनिवार्य आहे !

**शामराव** : असेल !

**परशुरामपंत** : परंतु प्रकरण कोर्टांत गेलं म्हणजे आपल्या मुलीला, माझ्या मुलाला आणि त्याच्या भावी वधूला, सर्वांनाच कोर्टांत यावं लागेल. यांतून जी वजबजपुरी माजेल ती दोन्ही–तिन्ही कुटुंबांना अतिशय अनिष्ट आहे. त्यांतून तुमच्या मुलीला तर फारच धोका आहे; कारण तिचं लग्न अजून ठरायचं आहे. माझ्या मुलाची टवाळी होईल, बदनामी होईल. परंतु जोपर्यंत आम्ही सर्वांनीं मिळून ठरविलेलं, सर्वांना मान्य झालेलं हें लग्न कायम आहे तोंपर्यंत आम्ही या लोकनिंदेकडे दुर्लक्ष करूं शकूं. आपल्या मुलीची स्थिति मात्र फार केविलवाणी होईल. बिचारीला जन्मभर कुंवार राहण्याची पाळी येईल !

**शामराव** : आपल्याला माझ्या मुलीचा आणि माझा सत्यानाश करायचा असेल तर आपण खुशाल करा ! मला कल्पना नव्हती कीं, आपण इतके—

**परशुरामपंत** : नाहींच ! म्हणून तर मी तुमच्याकडे आलों. कोणाच्याहि घराण्याची बेअब्रू झालेली मला पाहवणार नाहीं. तुमच्या मुलीकडे मी केवळ एक

मुलगी म्हणून पाहात होतों. तिला प्रत्यक्ष पाहिल्यानंतर तर मला वाटूं लागलं आहे कीं कांहींहि करून तिला तरी बचावलं पाहिजे. आणि तें आपल्या हातीं आहे. आतां तरी मला सांगाल का ? किती रुपये आपल्याला हवेंत ?

**शामराव :** आपल्या सहानुभूतीबद्दल मी आभारी आहे. मीहि आपल्याला अखेरचं सांगतों कीं आपण हें सर्व बोलणं बंद करा. आपण सूचित करीत असलेला आरोप मी यापुढं एक क्षणहि सहन करायला तयार नाहीं !

**परशुरामपंत :** ( ताडकन् उठून ) आपलं धैर्य असं भलत्या कामीं खर्च होत नसतं तर मी त्याचं कौतुक केलं असतं ! ( भरभर व रागानें बोलत ) आपली अशी कल्पना आहे कीं मी हवेंत बोलत होतों इतका वेळ ? आपलीं सर्व पत्रं माझ्याजवळ आहेत. तीं कोणाकडून लिहवून घेतली त्याचा तलास मला लवकरच लागेल. माझ्याबरोबर आलेला, खालीं उभा असलेला, मनुष्य इथल्या गुप्त पोलिस खात्यांतला आहे. आमच्या मुलीनं या पत्रांना जीं उत्तरं लिहिलीं तीं मुंबईत कुठून, कशीं, कुठें रवाना होतात हें पुराव्यानिशीं आज, या घटकेला, मजजवळ जय्यत तयार आहे. पत्रं पाठविण्यांत आपण हुशारी दाखविली असली तरी त्यांचीं उत्तरं अपेक्षित करण्यांत आपण घसरलांत ! या उत्तरांवरून आपल्यापर्यंत येणं ही फारच सोपी गोष्ट आहे. आपल्याला आणखी स्पष्ट माहिती हवी आहे ?

[ शामराव थिजून, स्तंभित होऊन, परशुरामपंताकडे नुसते पाहत उभे आहेत ! परशुरामपंत क्षणभर त्याच्या नजरेला नजर लावून पुन्हा खालीं बसतात आणि नेहमीच्या आवाजांत बोलूं लागतात. ]

अर्थात् मीं आपल्याला अगोदरच सांगितलं आहे कीं मला आपल्यावर फिर्याद करायची नाहीं, कीं हें प्रकरण कोर्टांत न्यायचं नाहीं. यांत माझ्या मुलाचीहि चूक आहेच. आणि माझ्या मुलासाठीं तरी या चुकीची भरपाई मी आनंदानें करायला तयार आहे. ( खिशांतून चेकबुक काढून ) किती चा चेक लिहूं ?

**शामराव** : मला नको आहेत पैसे.

**परशुरामपंत** : आपल्यावर काय संकट आहे याची मला या घटकेला कल्पना नाहीं. पण तें संकट खरं आहे हें मी समजूं शकतों.

**शामराव** : तें माझं मी पाहून घेईन. हें आणखी संकट आपण माझ्यावर न लादलंत तर उपकार होतील.

**परशुरामपंत** : उपकाराच्या बुद्धीनं हे पैसे मी आपल्याला मुळींच देत नाहीं. संकटांत साहाय्य म्हणा—अथवा आपल्या मुलींना खाऊ म्हणून म्हणा—आपण हे पैसे निःसंकोच मनानं घ्या. ( किंचित् थांबून ) आंकडा सांगतां का ?

**शामराव** : नाहीं !

**परशुरामपंत** : आपल्या सध्याच्या मनःस्थितींत माझा हा आग्रहहि योग्य नव्हे. मी असं करतों. दोन हजार लिहितों. ( चेक् लिहून ) मी सही केली आहेच. आपण आपलं नांव लिहून घ्या. ( उठून लिहिण्याच्या टेबलाकडे जातात व तेथें काळजीपूर्वक चेक् ठेवतात. ) इथं टेबलावर ठेवला आहे. मुंबईहून जाण्यापूर्वीं पुन्हां एकदां भेटूं. आपण माझ्या हॉटेलवर आलांत तर फारच बरं. हा हॉटेलचा पत्ता. ( व्हिजिटिंग कार्डावर पत्ता लिहून तोहि टेबलावर ठेवतात. ) आपण आलां नाहींत तर मी अवश्य येऊन जाईन. आणि त्यावेळीं आपल्याला आणखी किती साहाय्य हवं आहे हेंहि पाहीन. येतों मी.

[ परशुरामपंत धीम्या गतीनें दारापर्यंत जातात, दार उघडतात आणि अभिवादन करून निघून जातात. ते गेल्यावर शामराव डोळे मिटून घेऊन कोचावर पडतात. क्षणभरानें सैंपाकघराच्या दारानें सुलभा येते. शामरावांच्याकडे नजर टाकून, कांहींतरी निश्चयानें ती त्यांच्याजवळ येते व कोचावर शेजारीं बसते. ]

**सुलभा** : बाबा ! कधीं जायचं आपण ?

**शामराव** : ( दचकून डोळे उघडीत ) कुठं जायचं ?

**सुलभा** : कुठंतरी जाऊं, बाबा ! ( नाटकीपणानें ) दूर...दूर...या दुष्ट जगापासून दूर !... ‘ कोठें तरी जाऊं बसुनी शीघ्र विमानीं— अज्ञात ठिकाणीं ! ’

**शामराव** : ( आपल्याच विचारांत ) खरंच सुले ! मलाहि असंच वाटायला लागलं आहे कीं कुठंतरी अज्ञात ठिकाणीं जावं ! या ओळखीच्या जगाचा वीट आला आहे. जें जें करायला जावं त्याचा विपर्यास होऊन अंगाशीं येतंय्.

**सुलभा :** अन् बाबा ! विमानांत बसूनच जाऊं या ! आहेत आपल्याकडे पैसे, मग काय तर !

**शामराव :** ( थोडीशी कल्पना येऊन ) काय म्हणालीस तूं ?

**सुलभा :** ( बालिशपणें ) मला ठाऊक आहे बाबा !

[ तशीच नाचत टेबलाजवळ जाते, टेबलावरचा चेक दोन बोटात धरून शामरावांच्या जवळ येते आणि चेक त्याच्यासमोर नाचवते. ]

हे पहा पैसे खूप आहेत !

[ शामराव एका झटक्यासरशी तिच्या हातांतला चेक काढून घेतात आणि दरडावून विचारतात— ]

**शामराव :** सुले ! हा चावटपणा काय आहे ?

**सुलभा :** ( लाडिकपणें ) मला साऽरं ठाऊक आहे, बाबा ! आक्का किनई आंत सैंपाक करत होती. मी इथं—या दाराच्या आड उभी होतें ! ( थोडी त्यांच्याजवळ येत ) शोभतें कीं नाहीं मी तुमची मुलगी ?

**शामराव :** ( पूर्ण कल्पना येऊन, तिच्या अंगावर जात ) सुले !

**सुलभा :** ( हंसस हंसत, दूर पळत, लाडिकपणें ) असं हो काय बाबा !

**शामराव :** ( एकाएकीं स्वतःवरचा ताबा सुटून, ओरडत ) सुले, इकडे ये पाहूं !

[ शामरावाचा आवाज ऐकून सुमति बाहेर येते व स्तंभित होऊन पाहत राहते. सुलभा नाटकीपणा टाकून देऊन आवेशानें शामरावाच्या समोर येऊन उभी राहते ]

**सुलभा :** ही आलें. मारणार आहांत मला ?

**शामराव :** ( थिजून ) लाज वाटायला पाहिजे तुला !

**सुलभा :** कसची लाज वाटून घेऊं बाबा ? तुमची मुलगी म्हणून जन्माला आलें त्याची ? कां इतके दिवस मेल्यासारखी हें सहन करीत आलें त्याची ?

**शामराव :** चोरट्यासारखी दुसऱ्यांचीं बोलणीं ऐकतेस अन् वर तोंड करून बोलतेस पुन्हां ? बेशरम !

**सुलभा :** ( भावनावेगानें ) आम्हांला काय शरम वाटायची राहिली आहे बाबा ? शरमेनं आम्ही मरून गेलों आहोंत ! पण तुम्हांला कांहीं अंतःकरण आहे का ? दोन मुलींच्या आयुष्यावर निखारे ठेवायला तुम्ही निघालां होतां ! आपल्या स्वतःच्या मुलीचा विचार तरी तुम्हांला शिवायला हवा होता ! कसले हे तुमचे धंदे ! कुठलीं हीं तुमचीं संकटं ?

**शामराव** : ( ओरडून ) सुले, तोंड बंद कर !

**सुमति** : ( मध्यें पडून ) सुलू, शांत हो बरं.

**सुलभा** : ( उसळून ) मी शांत होऊं ? शांतपणाचा मक्ता तुझ्याकडे आहे, आक्का ! इतके दिवस डोळे असून पाहिलं नाहीं, कान असून ऐकलं नाहीं, मन असून मानलं नाहीं ! पण भडका झालाय् आतां ! आतां कशी शांत होऊं ?

**सुमति** : ( तिला जवळ घेऊन ) सुलू, माझं ऐकणार आहेस ना तूं ?

**सुलभा** : नाहीं आक्का ! आज मी कोणाचंच ऐकणार नाही ! मी ऐकवणार आहे ! मला बाबांना खूप खूप विचारायचं आहे. स्वतःचे धंदे करतांना, त्याचे चटके आमच्या जीवनाला लागत आहेत याचा त्यांनी कधीं विचार केला होता का ? पैशासाठीं कारस्थानं रचतांना, आमच्या शिक्षणाची, आमच्या भवितव्याची त्यांनीं कधीं चिंता केली होती का ? या जगांत आम्हांला मानानं जगणंसुद्धां अशक्य होत चाललं आहे, याची त्यांनीं कधीं दखल घेतली आहे का ?

**शामराव** : ( ओरडून ) आक्का ! हिला थांबव तूं !

**सुलभा** : ( कळवळून ) आक्कानं थांबवलं म्हणूनच मी इतके दिवस गप्प बसलें, बाबा ! बिचारी आक्का ! ती तरी काय करणार यापुढं ! तिच्याच जीवनाची होळी पेटवली आहे तुम्ही आज !

**शामराव** : ( संतापानें काय करावें तें न सुचून ) आक्का ! ही कार्टी वेड्यासारखं कांहींतरी बरळते आहे—

**सुलभा** : बाबा ! या क्षणीं तरी खोटं बोलूं नका !

**शामराव** : मी खोटं बोलतों ? माझ्यासमोर उभं राहून हे शब्द बोलतेस तूं ? माझे मार्ग चुकले असतील ! पण हें...हें...सारं कोणासाठीं करतों आहे मी ? माझ्या उरावर हें घेऊन जायचं आहे मला ?

**सुलभा** : बाबा ! सुंदर सुंदर कपड्यांत बाहुलीप्रमाणं नटवण्याऐवजीं, एखाद्या झोंपडींत, किंवा रस्त्याच्या कडेलासुद्धां, प्रामाणिक श्रमांनीं कमवून आणलेली साधी भाकरी जरी तुम्ही आम्हांला दिली असती, तरी आमच्या जीवनाची इतकी अवनति झाली नसती !

**शामराव :** ( संतापानें ) असं काय ? तुला भाकरीची अन् रस्त्याची स्वप्न पडताहेत ! मग राहिलीस कशाला या घरांत ?

**सुलभा :** आक्कासाठीं जीव तुटत होता म्हणून—

**शामराव :** ( ओरडून ) तुला मी नको आहे ना ? मग चालती हो माझ्या घरांत् —

**सुमति :** ( घाबरून ) बाबा ! काय करतां आहांत तुम्ही हें ? जेवायची वेळ आहे घरांत. यावेळीं हा तमाशा ?

**शामराव :** अजून उभी तूं ? चल नीघ—

[ आवेगानें तिच्या अंगावर धावून जातात. ]

**सुलभा :** आक्का ! जातें ग मी !

[ सुलभा झटक्यानें निघून जाते ]

**सुमति :** ( दारापर्यंत धावत जात, ओरडून ) सुलू ऽ ! थांब—

[ शामरावहि नकळत दारापर्यंत गेले आहेत. सुलभा जिना उतरून दिसेनाशी झाल्यावर ते दार धाडकन लावून घेतात आणि सुमतीचा स्पर्श टाळून सैपाक-घराच्या दारानें आंत निघून जातात. ]

सुमति एखाद्या पुतळीसारखी उभी आहे. दाराच्या आवाजानें ती दचकते आणि भांबावून इकडे तिकडे पाहूं लागते. तिची नजर चेकवर जाते. शामरावांच्या मघाच्या आवेशांत त्यांच्या हातून गळून तो जमिनीवर पडला आहे. सुमति यांत्रिकपणें चेक उचलते व त्याच्याकडे शून्य दृष्टीनें पहात उभी राहते.

इतक्यांत दाराच्या फळ्या लोटीत सुधीर आत येतो. सुमतीला समोर पाहून तो तिच्या पायाला बिलगतो. ]

**सुधीर :** आक्का ! भूक लागली !

[ कुठें तरी बाराचे टोके वाजतांना ऐकूं येऊं लागतात. सुधीर सुमतीकडे पहातो. ती कांहींच बोलत नाहीं हें पाहून तो तिला जोरजोरानें बुसळतो. ]

**सुधीर :** आक्का ! दे ना ग खायला !

[ भारावलेल्या मनःस्थितींत, त्याच्याकडे न पाहतांच, सुमति त्याच्यापुढें चेक करते. सुधीर त्याकडे एकदां पहातो आणि मग चिडून त्याच्या चिंध्या करतो. ]

● ● ●

# ३

[ तीन दिवसांनतर. सैपाकघराच्या भिंतीजवळच्या टेबलाशीं बसून सुमति कांहीं भरतकाम करीत आहे. रेशमाच्या लडी, कात्री इत्यादि साहित्य टेबलावर पडलेलें आहे. तिचें कामाकडे लक्ष नाहीं हें वारंवार चुकणाऱ्या तिच्या टाक्यावरून लक्षांत येण्यासारखें आहे. पलीकडे, आरशासमोर उभें राहून शामराव टाय बांधीत आहेत. ते बाहेर जाण्याच्या तयारींत आहेत. परंतु त्यांच्याहि हालचालींवरून वातावरणांत दाटलेला निःशब्द जडपणा प्रतीत होतो आहे. दुपारची वेळ. ]

**शामराव** : आक्का, मी जाऊन येतों.

**सुमति** : ( वर न पाहतांच ) बरं.

**शामराव** : सुधीला फार लागलं नाहीं ना ?

**सुमति** : कपाळाला अन् हनुवटीला लागलंय्. ओठ थोडासा फाटलाय्.

**शामराव** : ताप आहे ?

**सुमति** : आतां नाहीं.

**शामराव** : मी आंत जाऊन पाहून येऊं का ?

**सुमति** : त्याला झोंप लागलीय् असं वाटतं.

**शामराव** : मी दिलेल्या गोळ्यांचा उपयोग होतो आहे ना ?

**सुमति** : हो.

**शामराव** : बरं ! मी डॉक्टरांच्याकडे जाऊन येतों.

**सुमति** : हं.

[ शामराव दरवाजापर्यंत जातात व पुन्हा परततात. ]

**शामराव** : आक्का ! सुलीचं कांहीं समजलं ?

**सुमति** : नाहीं.

**शामराव** : तिचे कोणी मित्र—

**सुमति** : ( प्रथमच त्यांच्याकडे पाहात ) बाबा ! आम्हांला कोण मित्र आहेत ? एकस्या पंडिताशिवाय इथं येतंय् कोण ? अन् तोहि किती दिवसांत आलेला नाहीं. तुमचं कधीं घराकडे लक्ष नसलं म्हणजे आम्हींहि मर्यादा सोडून वागतो कीं काय ?

**शामराव** : ( तिच्या अविर्भावानें बिचकून ) आक्का, मी असं केव्हां म्हटलं ?

**सुमति** : मग तुम्हीं हा प्रश्न कां केलांत ? सुलू अवखळ असेल... फटकळ असेल ! पण ती माझ्यासारखी तुमचीच मुलगी आहे ना ? माझ्यावर तुमचा विश्वास आहे, मग तिच्यावर कां नाहीं ?

**शामराव** : मी सहज विचारलं. त्याचा किती विपर्यास केलास तूं, आक्का ?

**सुमति** : सगळ्या जीवनाचाच विपर्यास झाला आहे ! पैशावर चाललेल्या या जगांत सत्य आणि प्रामाणिकपणा, एखाद्या निराधार मुलाप्रमाणं, कोंपऱ्यांत खालीं मान घालून बसले आहेत. त्यांना प्रकाशांत यायला संधि नाहीं. त्यांनीं धीर धरून पुढं यावं अशी कोणाची इच्छा नाहीं.

**शामराव** : ( तिच्याजवळ येत, प्रेमळपणें ) आक्का ! तुझी प्रकृति ठीक नाहीं. म्हणून तुझ्या मनांत वाटेल ते विचार यायला लागले आहेत. दोन दिवसांत तूं बिछान्याला पाठ लावली नाहींस. माझं ऐक पाहूं—

**सुमति** : सुधीरजवळ निजलें होतें इतका वेळ.

**शामराव** : ती विश्रांति नव्हे ! तुला अतिशय शीण झाला आहे. तुझं मनहि ठिकाणावर नाहीं. तूं जरा पड पाहूं.

**सुमति** : बाबा, मन ठिकाणावर नसलं तर शरीर तरी कुठल्या ठिकाणीं ठेवायचं ? त्यापेक्षां, शरीर असं कामांत गुंतवलं म्हणजे तरी मन कांहीं वेळ धाकानं गप्प बसतं !

**शामराव** : आक्का ! जगाच्या चिंता तूं कशाला करतेस ? मी आहे कीं पाहायला सारं !

**सुमति** : म्हणूनच सुलूचं काय झालं तें पाहायला तुम्हांला सवड होत नाहीं वाटतं ?

**शामराव** : ( अपराधीपणानें ) त्या कार्टीनं आणखी एक गोंधळ करून ठेवला

आहे ! तोंडाला काळं लावलं नाहीं म्हणजे मिळवली ! मी बोललों संतापाच्या भरांत... पण म्हणून, असं निघून जायचं ? मूल झाली म्हणून काय झालं ? असं वागावं ?

**सुमति :** वडील झाले म्हणून आपल्याच मुलांचा इतका राग करावा ?

**शामराव :** असं नाहीं आक्का ! मला वाटलं जातेय् कुठं ? येईल परत. म्हणून मी लक्ष दिलं नाहीं. गेल्या दोन दिवसांत तूंहि कांहीं बोलली नाहींस...तेव्हां मला वाटलं तुला कांहीं माहीत आहे—

**सुमति :** मला माहीत असतं, किंवा घर सोडून, कुठं जाऊन तपास करायची शक्यता असती तर,...असं काळजींत बुडून जायची मला गरज नव्हती. मला माहीत असूनहि तुम्हांला न सांगण्याइतका खोटेपणा आणि कपट माझ्या अंगीं आहे असं तुम्हांला वाटूं लागलं आहे ना ? ( तिला हुंदका येतो. )

**शामराव :** ( बावरून ) आक्का ! माझ्या सरळ बोलण्याचा तूं गैरसमज करून घेते आहेस ! हें काय ? ( गहिंवरून ) मलाहि रडवायचं आहे कां तुझ्या मनांत ?

**सुमति :** ( हुंदके देत ) सगळ्यांनाच रडायची वेळ येणार आहे आतां !

**शामराव :** आक्का ! असं भलतंसलतं बोलूं नकोस !

**सुमति :** मग काय करूं ? वाईट शंकांनी मन हादरून गेलं आहे. सारखं वाटतं कीं...सुलूनं आपल्या जीवाचं कांहींतरी बरंवाईट—

**शामराव :** ( दचकून ) आक्का !

**सुमति :** ( त्यांच्याकडे पाहात ) मग तुमची काय कल्पना आहे बाबा ? सुलू कोणाचा हात धरून निघून गेली ?

**शामराव :** मी असं म्हटलं का, आक्का ? तुला वाटतं मी स्वस्थ बसलोंय्. पण तूंच सांग. तपास करायचा म्हटलं तरी मी कुठं जाऊं ? ( ते किंचित् थांबतात. ती कांहींच बोलत नाहीं हें पाहून ) मी वसंतला म्हटलं आहे... कीं सारी मुंबई पालथी घाल. अन् कांहीं पत्ता लागला तर धावत मला सांगायला ये—

**सुमति :** मीहि सांगितलं आहे वसंतला.

**शामराव** : मी त्याला म्हटलं होतं, होस्टेलमध्यें पंडितकडे जाऊन विचार. पंडितच्या वडलांना भेटून ये...त्यांनी जर कांहीं सल्ला दिला तर—! मीच गेलों असतों पण त्यांना भेटायचा संकोच वाटतो. त्यांतून सुधीर जिन्यावरून पडल्यापासून माझं कशांत लक्षच लागत नाहीं, आक्का !

**सुमति** : तो कांहीं पहिल्यान्दांच पडला आहे का ? इतका हूड आहे...दिवसांतून दहा वेळां धडपडत असतो ! ओठ फाटलाय्; म्हणून मी म्हटलं तुम्हांला कीं डॉक्टरकडे जाऊन या. सुधीरची तशी काळजी करायला नको.

**शामराव** : बरं. ( जाऊं लागतात. पुन्हां परतून ) आक्का ! माझ्या मनांत दोन तीनदां येऊन गेलं कीं पोलिसांत जाऊन कळवावं. पण पुन्हां वाटलं कीं सुली म्हणजे कांहीं लहान मूल नाहीं !

**सुमति** : हो...तेंहि खरंच !

**शामराव** : वसंत कांहीं बातमी आणील तर त्याची वाट पहात होतों. पण सकाळपासून त्याचाहि ठिकाणा नाहीं ! मी आत्तांच जाऊं का शोधायला ?

**सुमति** : नको. येऊं द्या वसंतला. संध्याकाळपर्यंत पाहूं वाट.

**शामराव** : बरं. मी डॉक्टरना घेऊन येतों.

[ स्टॅन्डवरची फेल्ट घालून शामराव निघून जातात. सुमति काही वेळ तशीच बसून राहाते. मग सुधीरला पाहाण्यासाठी म्हणून आंत जाते. जरा वेळानें ती बाहेर यायला आणि वसंत धापा टाकीत वर यायला एकच गाठ पडते. ]

**वसंत** : आक्का—

**सुमति** : ( अधीरपणें ) वसंत, लागला का रे सुलूचा तपास ?

**वसंत** : हो.

**सुमति** : ( आनंदानें उतावीळपणें ) कुठं होती रे ? आतां कुठं आहे ती ? तुझ्याबरोबर कां नाहीं आली ? तूं कां आणलं नाहींस तिला बरोबर ?

**वसंत** : आक्का, मला दम तर घेऊं दे ! ( किंचित् थांबून ) बाबांच्या सांगण्याप्रमाणं मी पंडितच्या खोलीवर गेलों होतों. तिथं सुलू नव्हती. पण पंडितच्या अर्धवट, तुटक बोलण्यावरून मला वाटलं कीं, त्याला कांहींतरी माहिती आहे. मग मी त्याच्या खनपटीलाच बसलों. तेव्हां त्यानं कबूल केलं कीं सुलू आली होती. मग मी विचारलं कीं आतां कुठं आहे ? तरी

काहीं सांगेना. त्याला माहीत नव्हतं असं दिसलं. शेवटीं म्हणाला कीं, ' जा...समुद्रावर गेली असेल जीव द्यायला ! '

**सुमति** : ( घाबरून ) खरंच ?

**वसंत** : हो... अन् तुलाहि शंका होतीच ना ? मी तसाच चौपाटीवर गेलों. एकेक कोपरा शोधून पाहिला. तिथं जे जे दिसले त्यांना विचारून पाहिलं. वाटेंत पंडितच्या वडलांना जाऊन भेटलों. पण ते बाहेर जायच्या तयारींत होते. मग आपल्या इथल्या समुद्रावर आलों. पण कांहीं पत्ता म्हणून लागेना. निराश होऊन विचार केला कीं आतां पंडितच्या वडलांच्याकडे पुन्हां जावं. तसाच समुद्रावरून हळुहळू परत येत होतों तर...तर काय ? रेस्टॉरंटच्यासमोर फूटपाथवर सुळू उभी !

**सुमति** : ( अधीरपणें ) काय करीत होती तीं ?

**वसंत** : सांगतों ना ! माझा प्रथम माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. म्हणून धांवत जवळ जाऊन खात्री करून घेतली. सुळूच होती... अन् ती शून्य दृष्टीनं कुठंतरी पाहात नुसती उभी होती !

**सुमति** : आजाऱ्यासारखी दिसली का रे ?

**वसंत** : तसं नाहीं सांगतां येणार. पण खूप दमलेली दिसली. अन् अगदीं मलूल झालेली होती. सुकून गेलेल्या फुलासारखी. मला पाहातांच ती म्हणाली, ' वसंत, मला खूप भूक लागली आहे. '

**सुमति** : ( कळवळून ) अयाई ग ! तूं काय केलंस वसंत ?

**वसंत** : ( हंसून ) अग मलासुद्धां काय कमी भूक लागली होती ? सकाळपासून हा वेळपर्यंत भटकत होतों सारखा ! आम्हीं दोघं त्या रेस्टॉरंटमध्यें गेलों आणि पोटभर फराळ केला.

**सुमति** : ( डोळ्यांत आलेले आंसू पुशीत ) मग ती घरीं कां नाहीं आली ?

**वसंत** : अग, प्रथम येते म्हणून म्हणाली. अन् मागाहून म्हणते कीं आक्कालाच बोलावून आण इकडे.

**सुमति** : ती आहे कुठं ?

**वसंत** : रेस्टॉरंटमध्येंच बसली आहे.

**सुमति** : ( आशंकेनें ) तिथून जाणार तर नाहीं ना ?

**वसंत** : ( जरा अभिमानानें ) तूं मला इतका बावळट समजतेस कीं काय? सुळू एकदां सांपडल्यावर मी तिला असा सोडून येईन, होय? मी तिला शपथ घातली आहे माझी! अन् वर तिच्याकडून हातावर हात मारून वचन घेतलं आहे! तेव्हांच तर आलों सांगायला तुला!

**सुमति** : ( आनंदानें ) शाबास वसंत! किती चांगला आहेस तूं!

**वसंत** : ( जरा लाजून ) असं नाहीं आक्का—

**सुमति** : ( विचारांत पडल्यासारखें ) पण वसंत, सुधीरला सोडून मी येऊं कशी तो घरांत आजारी अन् मी एकटी. एका मिनिटाची चुकामूक झाली; नाहींतर बाबा तरी सांपडले असते घरांत.

**वसंत** : आक्का, बरं झालं बाबा नाहींत यावेळीं सुळू त्यांनाच घाबरते आहे. मी जातों अन् घेऊन येतों तिला.

**सुमति** : ( अधीरपणें ) जा, जा वसंत! तिला सांग...सुधीर पडला आहे. जिन्यावरनं...नाहींतर मीच आलें असतें.

**वसंत** : ( ओशाळून ) एक बावळटपणा झालाच माझा, आक्का! सुधीरच्या अपघाताचं सांगायचं विसरूनच गेलों. नाहींतर ती माझ्याबरोबरच आली असती.

**सुमति** : हरकत नाहीं· आतां सांग. अन् लवकर घेऊन ये तिला.

[ वसंत जाऊं लागतो. त्याच्याबरोबर दारापर्यंत जाऊन जिन्याच्या तबकडींतून जरा मोठ्यानें आणि अधीरपणें बोलत— ]

वसंत, बाबा घरीं नाहींत हें सांगायला विसरूं नकोस हं? आणि ए, तिला म्हणावं माझी शपथ आहे! अं?

[ वसंत गेल्यावर कांहीं वेळ ती जिन्याजवळ तशीच उभी राहाते. मग हळुहळू आंत येते. तिच्या मुद्रेवर निश्चितपणें फरक झाला आहे : काळजीचे ढग वितळायला लागल्याचे चिन्ह दिसत आहे. ती एकदां आत जाऊन सुधीरला पाहून येते आणि मग पुन्हां भरतकामाचें साहित्य हाताशीं घेते. अधीरपणामुळें तिचें या कामाकडे लक्ष लागत नाहीं. उठून ती टेबलापासून दारापर्यंत फेऱ्या घालू लागते. अशीच फेरी घेत असतांना, तिची दाराकडे पाठ असतांना, पंडित येऊन दाराजवळ उभा राहातो. उलटी फेरी घेऊन दाराजवळ जाईपर्यंत तिचें पंडितकडे लक्ष जात नाहीं. मग— ]

**सुमति** : ( दचकून ) कोण ? पंडित ?

[ पंडित आंत येऊन, डोक्यावरची सन हॅट स्टॅन्डला अडकवितो आणि एका खुर्चीवर येऊन बसतो. ]

**सुमति** : इकडे कसा आलास तूं यावेळीं ?

**पंडित** : कां, नको होतं यायला ?

**सुमति** : तो तुझा प्रश्न आहे ! येण्याचं कांहीं प्रयोजन नाहीं म्हणून विचारलं.

**पंडित** : ( चमकून, उठत ) सुमति ! तुझ्या या वाक्याचा काय अर्थ आहे ?

**सुमति** : कांहीं नाहीं.

**पंडित** : वेगळ्या शब्दांत, तूं मला इथून चालता हो असंच म्हटलं आहेस !

**सुमति** : आमच्या घरीं येणाऱ्या सभ्य माणसांना हुसकावून लावण्याइतके आम्हीं असभ्य झालों नाहीं अजून !

**पंडित** : मग माझ्या येण्यांत प्रयोजन नाहीं असं कसं म्हणालीस ?

**सुमति** : ( कृत्रिमपणें हंसत ) खरंच. विसरलें मी ! लग्नाचं आमंत्रण द्यायला आला असशील, नाहीं ? कधींचा आहे मुहूर्त ?

**पंडित** : सुमति, माझं ऐकून तर घेशील ?

**सुमति** : इतकी आठवण ठेवून आल्याबद्दल मी सर्वांच्या वतीनं आभार मानतें तुमचे !

**पंडित** : सुमति, माझं ऐकून घेतल्याशिवाय कांहीं न बोललीस तर उपकार होतील ! मला तुला खूप खूप सांगायचं आहे. अन् त्यासाठींच मी आलोंय्.

**सुमति** : मला वाटतं या विषयाची चर्चा या घरांत यापुढें न झाली तर बरं.

**पंडित** : पण मी काय सांगतों—

**सुमति** : ( मुद्दाम विषयांतर करीत ) सुलूच समजलं का तुला ?

**पंडित** : ( घाबरून ) म्हणजे ? खरंच जीव दिला कीं काय तिनं ?

**सुमति** : असं अभद्र काय बोलतोस ? आम्हांला कांहीं आमची मुलगी भारी झाली नाहीं,...की तिचा सौदा करायला आम्ही निघाला नाहीं !

**पंडित** : सॉरी ! माझ्या म्हणण्याचा तसा उद्देश नव्हता.

**सुमति** : ( त्याच्याकडे दुर्लक्ष करीत ) भारी मानी अन् अवखळ आहे. आणि

तिच्या मनाला कशाची भीति म्हणून वाटत नाहीं ! वसंतनं येऊन सांगितलं म्हणून बरं झालं बाई !

**पंडित** : काय सांगितलं वसंतानं ?

**सुमति** : खरंच ! सुळ समुद्रावर गेल्याचा तूं जो उल्लेख केलास तो कशा बुद्धीनं केलास तें तुझं तुलाच माहीत. पण त्याबद्दल आम्ही फार फार आभारी आहोंत ! कारण, त्याच्याच आधारानं वसंतला सुळूचा पत्ता लागला.

**पंडित** : सुमति, माझ्या एका प्रश्नाचं खरं खरं उत्तर देशील ?

**सुमति** : ( मुद्दाम हंसत ) म्हणजे, मी केव्हां केव्हां खोटं बोलतें असंच ना ?

**पंडित** : तूं असा अर्थाचा अनर्थ करूं नकोस. ( एकदम ) मी तुला सरळच विचारतों. तुझं माझ्यावर प्रेम आहे ना ?

**सुमति** : जरूर काय हा प्रश्न विचारण्याची ?

**पंडित** : आहे म्हणूनच विचारतोंय्.

**सुमति** : अस्सं ! त्यापेक्षां महत्त्वाचा प्रश्न माझ्यापुढें आहे. तूं जो इतके दिवस आमच्याकडे येत आहेस तें कशासाठीं ? हे संबंध तूं कां वाढवलेस ? तुला खेळ खेळायचा होता माझ्याशीं ?

**पंडित** : मी सांगतों सारं. माझ्या प्रश्नाचं उत्तर दे अगोदर.

**सुमति** : कां ?

**पंडित** : मी जर म्हटलं, हा माझा जीवनमरणाचा प्रश्न आहे, तर तूं विश्वास ठेवशील का ?

**सुमति** : कठीण आहे !

**पंडित** : ( विनवून ) सुमति, असं काय बोलते आहेस तूं आज ?

**सुमति** : तुझ्या जीवनाचा प्रश्न दुसऱ्याच्या मरणानं तूं सोडवायला निघाला आहेस म्हणून !

**पंडित** : खोटी गोष्ट आहे ही.

**सुमति** : ( उसळून ) खोटं आहे हें ? मग त्या दिवशींच्या प्रसंगाचा अर्थ काय ? तुझे वडील तर मला विकत घ्यायला निघाले आहेत ! बाबांचं सोडून दे !...मला कल्पना नव्हती ! इतके ते बदमाष असतीलहि...! त्यांनीं काढले असतील पैसे...अन् तुझ्या वडलांनीं दिले असतील...! कारणं कांहीं कां असेनात ! पण तुझं काय ?

**पंडित** : ( ओशाळून ) सुमति, झाल्या प्रसंगाची आठवण कशाला? आपल्या दोघांतल्या प्रेमाचा हा प्रश्न आहे, आणि त्यांत आबांचा संबंध आणायची खरं म्हणजे जरूर नाहीं.

**सुमति** : कां? तुझं लग्न तर अगोदरच ठरलेलं आहे. मला जर हें अगोदर-पासून माहीत असतं तर मी जपून वागलें असतें. तें राहूं दे. पण तूं तर घराचा संबंध तोडून आतां माझ्याकडे आला नाहींस ना?

**पंडित** : त्यापेक्षां, मी जर असं म्हटलं कीं, त्या मुलीचा अन् माझा कांहीं संबंध उरला नाहीं तर—?

**सुमति** : शक्यच नाहीं!

**पंडित** : सुमति, माझ्या शब्दांवर विश्वास ठेव.

**सुमति** : अस्सं! म्हणजे, तिनं नाकारलेलं दिसतंय तुला—

**पंडित** : तुला हवं तसं समज!

**सुमति** : एक बायको हातची निसटली म्हणून दुसरीला धरायला आला आहेस, असंच ना?

**पंडित** : ( अस्वस्थ होऊन ) सुमति, तुला जें बोलायचं असेल तें बोलून घे! माझ्याच वागण्यानं जे परिणाम उद्भवले आहेत त्यांचं फळ मला भोगलंच पाहिजे. कोणाला एकदम, स्पष्ट शब्दांत, तोडून टाकायचं धैर्य माझ्यांत नाहीं, हा माझा मोठाच अपराध आहे! त्या अपराधाची शिक्षा व्हायलाच पाहिजे! मी सगळ्या गोष्टी तुला सांगितल्या नाहींत हें कबूल. पण माझं लग्न ठरलं होतं तर मी इथं कां येत होतों? आजहि कां आलों आहे? नुसती गंमत म्हणून तर नाहीं ना? इतक्या दिवसांच्या आपल्या मैत्रींत, चुकूनसुद्धां माझ्या तोंडून एखादा अयोग्य शब्द बाहेर पडला असेल, किंवा माझ्या वागण्यांत कांहीं चूक झाली असेल, तर त्याला तूंच साक्ष आहेस! म्हणजे, त्या मुलीपेक्षां मला तूं जास्त आवडतेस अन् तुझ्याशींच—

**सुमति** : ( मनांतून आनंदून, पण वरकरणी थट्टेनं ) पंडित! इतक्या दिवसांत माझ्याशीं बोलतांना, येवढीं वाक्यं एका दमांत तूं आज प्रथमच बोलला आहेस! भाषण लिहून पाठ तर केलं नाहीस?

**पंडित** : ( व्यथित होऊन ) तुला अजून थट्टा करायची असली तर खुशाल कर. पण

हें सगळं माझ्या मनांत होतं...म्हणून तो पाहिला प्रश्न मी तुला विचारला.

**सुमति :** ( हंसत ) तूं पडलास मेडिकलचा विद्यार्थी ! पण पंडित, मेलेल्या प्राण्यांच्या शरिराचा अभ्यास करण्याऐवजीं, जिवंत माणसांच्या मनाचा अभ्यास करायला शीक ! म्हणजे असे प्रश्न विचारण्याची जरूर भासणार नाहीं !

**पंडित :** ( तिच्या बोलण्याची सूक्ष्मता न समजून ) दुसरा कांहीं अभ्यास होईल कीं नाहीं तें सांगतां येत नाहीं. पण मेडिकल्चा अभ्यास मात्र बंद होणार आहे बहुतेक !

**सुमति :** ( आश्चर्यानें ) म्हणजे ?

**पंडित :** मला होस्टेलमधून काढून टाकलं आहे.

**सुमति :** शक्यच नाहीं !...काढून टाकण्याचं कारण ?

[ जिन्यावर चाहूल लागते. सुमति घाईनें उठून दरवाजाजवळ जाते. सुलभा आणि वसंत येत आहेत. पंडितचे दाराकडे लक्ष नाहीं. तो आपल्याच विचारात आहे. ]

**पंडित :** ( सुमतीच्या प्रश्नाचं उत्तर देत ) सुलभा.

**सुमति :** ( आनंदानें किंचाळत ) सुलू ऽ—

**पंडित :** ( न समजून ) मी काय खोटं सांगतोंय् ?

[ खुर्चीतून ताडकन उठून तो सुमतीकडे वळतो. पण दाराजवळील दृश्य पाहून तसाच थबकून उभा राहातो. ]

**सुमति :** सुलू ऽ—

**सुलभा :** आक्का—

[ दोघी दारांतच एकमेकींना कडकडून मिठी मारतात. ]

**सुमति :** ( आनंदानें ) सुलू, आलीस बाई एकदांची ? वसंतनं सांगितलं तरी डोळ्यांनीं तुला पाहीपर्यंत जाव ठिकाणावर नव्हता !

**सुलभा :** ( हंसून ) न येऊन सांगतेंय् कोणाला ! मुलाची जात म्हणजे चुकलेलं जनावर. धन्यानं मारून काढलं तरी पुन्हां खुंटाशीं येऊन उभं राहाणारच !

**सुमति :** चल, कांहींतरी बोलूं नकोस ! बाकी, तुझा स्वभाव अगदीं बाबांच्या-सारखा आहे. आपण काय करतों आहोंत, त्याचा परिणाम काय होईल, याचा मुळीं विचारच करायचा नाहीं !

**सुलभा :** वडलांचीच लेक मी ! तरी बरं..., पैशाची अफरातफर करायचा गुण आला नाहीं माझ्यांत अजून !

**सुमति :** सुलू, बाबांना मागून फार वाईट वाटलं हं !

**सुलभा :** खरं ? माझी कल्पना होती कीं जिन्यावरच हातांत काठी घेऊन उभे असायचे ! म्हणून तर डरत होतें.

**सुमति :** वा ग वा ! अशी किंमत करतेस बाबांची ?

**सुलभा :** त्यांनीं काय माझी किंमत ठेवली आहे ? खरं सांगतें आक्का ! तुझा विचार मनांत येऊन हातपाय लटपटले. तरीसुद्धां हा वसंत दिसला नसता तर, जाऊन समुद्रांत उडी घ्यायचा विचार चालला होता माझ्या मनांत !

**सुमति :** ( तिच्या तोंडावर एकदम हात ठेवीत ) सुलू, पुन्हां ते शब्द बोललीस तर पाहा !

**सुलभा :** ( तिचा हात दूर करून, हंसत ) या वसंताचे आभार तरी मान.

**सुमति :** ( मनापासून ) त्याचे आभार कोणत्या शब्दांत मानूं ?

**सुलभा :** ( हंसत ) अग, मला तर भीतिच पडली आहे. त्यानं मला शोधून काढलं, जेवायला घातलं, घरीं परत आणलं ! कांहीं नाहीं तर कृतज्ञता म्हणून तरी, एक दिवस मला त्याच्याशीं लग्न करावं लागणार आहे !

[ दोघी हसतात. वसंत हसता लाजून खालीं पाहातो. ]

**सुमति :** सुलू, पण मुख्य सांगायचं राहिलचं आहे. तूं होतीस कुठं ?

**सुलभा :** मला सुधीरला पाहूं दे अगोदर.

**सुमति :** अजून झोपेंत असला तर उठवूं नकोस हं.

**सुलभा :** नाहीं. ( उपहासानें ) तोंपर्यंत माझी हकीकत या पंडितला विचार.

[ सैपाकघरांत जाते. वसंत उगीचच तिच्या मागोमाग जातो. ]

**सुमति :** सुलूचं तुला माहित होतं असं कांहीं बोलला नाहींस तूं ?

**पंडित :** म्हटलं, तुम्हां दोघी बहिणीचं एकमेकींना मिठ्या मारून भेटणं संपू दे, मग पाहूं !

**सुमति :** चिडायला काय झालं असं ?

**पंडित** : छेः, कांहींच नाहीं ! तुम्ही भेटा कडकडून. इकडे माझा सत्यानाश झाला तरी हरकत नाहीं !

**सुमति** : काय, झालंय् तरी काय ?

**पंडित** : सुलभा दोन-तीन दिवस कुठं होती हें तुला हवंय् ना ? माझ्या ऐवजीं तिनंच सांगितलं असतं म्हणजे बरं झालं असतं. म्हणजे मी कांहीं बनवून सांगतों आहे असा संशय तरी आला नसता तुला !

**सुमति** : उगीच छळ करूं नकोस. काय असेल तें स्पष्ट बोल.

**पंडित** : सुलभा होस्टेलमध्यें होती. माझ्या खोलींत !

**सुमति** : ( आश्चर्यानें ) तुझ्या खोलींत ?

**पंडित** : हो.

**सुमति** : ( अविश्वासानें ) पण ती आली कशी ? अन् तूं राहूं कशी दिलीस तिला .

**पंडित** : ( चिडून ) ती कशी आली तें तिला विचार. माझ्याकडे आल्यानंतर आणि तिनं विनवणी केल्यानंतर, मी तिला कसं सांगूं कीं इथून चालती हो ?

**सुमति** : ( विचारांत ) नाहीं.. पण—

[ सुलभा येते. तिच्या पाठोपाठ वसंत आहे हें सांगायला नकोच. पंडित व सुमति यांचे पवित्र आणि चेहऱ्यावरील भाव पाहून सुलभा जरा स्तिमित होते. मग— ]

**सुलभा** : आक्का—

**सुमति** : ( एकदम ) सुलू, तूं पंडितकडे राहिली होतीस ?

**सुलभा** : मग काय करणार आक्का ? घरांतून बाहेर तर मोठ्या आवेशांत पडलें. पण रस्त्यावर आलें अन् डोकं गरागरायला लागलं. कुठं जाऊं अन् कोणाकडे जाऊं, कांहीं सुचेना ! कुठं गेलें असतें तर पैसेहि नव्हते जवळ. तशीच वेड्यासारखी चालत सुटलें... मी चालत नव्हतें, रस्ता मला नेत होता ! अशी पंडितच्या हॉस्टेल्‌जवळ येऊन पोहोंचलें. हॉस्टेल् दिसल्यावर मात्र भानावर आलें आणि मग सरळ याच्या खोलींत जाऊन उभी राहिलें.

**सुमति** : आणि मग ? तिथंच राहिलीस...झोंपलीस ?

**सुलभा** : मग करणार काय ?

**पंडित :** ( मध्येंच सुमतीला उद्देशून ) आतां माझं बोलणं खरं वाटेल ना ?

**सुमति :** ( विचारांत ) पण तिथं तूं राहूं कशी शकलीस ?

**सुलभा :** गुपचुप राहिलें. पहिली रात्र तर तशीच काढली. दुसऱ्या दिवशीं यानं एका नर्सकडून एक सफेत साडी आणून दिली. मेस्‌मधून जेवणाचं ताट येत होतं. बस्...आणखी काय पाहिजे ? ( मोकळेपणानें हंसते. )

**पंडित :** ( चिडून ) मी मात्र उपकार करायला गेलों आणि गळ्याला फांस लावून घेतला !

**सुलभा :** ( घाबरून ) काय झालं ?

**पंडित :** दुसरं काय व्हायचंय् ? होस्टेल्‌मधून काढून टाकलं आहे मला !

**सुलभा :** ( अविश्वासानें ) पण असं कसं होईल ?

**पंडित :** ( वेडावून ) म्हणे कसं होईल ! मुलांच्या होस्टेल्‌मध्यें मुली येऊन राहूं शकतात ? तरी तुला म्हटलं होतं कीं कुठल्या तरी हॉटेलांत तुझी सोय करून देतों—

**सुमति :** खरंच सुलू ! घरीं यायचं नव्हतं तर हॉटेलांत कां जाऊन राहिली नाहींस तूं ?

**सुलभा :** ( बावरून ) आक्का ! अनोळखी हॉटेलांत मी कशी राहूं शकलें असतें ? माझ्यासारखी मुलगी...जवळ कोणी नाहीं...अन् हॉटेलचं वातावरण... कोणाच्या आधारावर राहाणार मी परक्या ठिकाणी ?

**पंडित :** तें ठीक आहे ! पण इकडे माझी काय अवस्था झाली ? तीन रात्र एक मुलगी माझ्या खोलींत राहिली आहे, ही गोष्ट लपवायची म्हटलं तरी किती लपविणार मी ! सुपरिंटेंडेंटनीं दिलीच आहे नोटीस...आतां डीन्‌चं फर्मान काय सुटतं तें ऐकायचं आहे ! वर आबा आहेतच फाडून खायला !!

**सुलभा :** ( रडकुंडीला येऊन ) मला येवढी कल्पना नव्हती रे, पंडित ! मी कांहीं करूं शकेन का ? मी स्वतः येऊन सांगतें—

**सुमति :** ( आपल्याच विचारांत ) सुलू, तूं अगदीं चूक केलीस !...ओळखीचे असलांत तरी...तुम्ही दोघे अविवाहित,...तरुण...! तूं नेसत्या साडी-निशीं घराच्या बाहेर पडलीस...अन् तीन रात्र त्याच्या खोलींत... एकटी...राहिलीस ! याचा अर्थ—

**सुलभा :** ( तिच्या मनांत कांहींतरी कल्पना येते. त्याबरोबर तिला जोरानें हुंदका फुटतो. भावनावेगानें ती सुमतीच्या पायाशीं कोसळते. ) आक्का, आक्का ! तुला संशय आला आहे माझा ! तसं असलं तर अशी चाचरत बोलूं नकोस. स्पष्ट बोल. म्हणजे आत्तांच्या आतां जीभ हासडून तुझ्या पायाशीं प्राण देतें.

[ वसंत आणि पंडित दोघेहि या अनपेक्षित कलाटणीनें स्तंभित होतात, भेदरून जातात. ]

**वसंत :** ( घाबरून ) आक्का !

**पंडित :** सुमति, काय बोलते आहेस तूं हें ?

**सुमति :** ( भानावर येऊन, रडत ) सुलू ! अग, मी काय म्हटलं ?

[ सुलभेला उचलून जवळ घेते. सुलभा तिच्या खांद्यावर डोकें टेकून तशीच हुंदके देते. ]

**सुमति :** सुलू, उगी बरं आतां ! सुलू, माझ्या मनांत विचारांचा इतका भयंकर गोंधळ माजला आहे कीं, तोंडांतून बाहेर पडणारे शब्ददेखील भांबावून गेले आहेत ! एका साध्या गोष्टीचा काय अनर्थ होऊं शकेल याच्या कल्पनेनं माझं चित्त थरारून गेलं आहे. या गोष्टीला वाचा फुटली तर लोक याचा अर्थ काय करतील या भीतीनं माझी छाती दडपून गेली आहे. मी हें सांगण्याचा प्रयत्न करीत होतें बरं !

**सुलभा :** माझ्याविषयीं संशय—

**सुमति :** खुळे ! तुझ्या आक्काचं डोकं कांहीं फिरलं नाहीं !

**पंडित :** पण माझं मात्र डोकं फिरायची वेळ आली आहे !

**सुलभा :** ( त्याच्याजवळ जाऊन ) पंडित, मी तुझी कोणत्या शब्दांनीं क्षमा मागूं ? मी अपराधी आहे तुझी. तूं वाटेल ती शिक्षा कर मला. सांग, काय करूं मी ?

**पंडित :** डोकं दाबून धर माझं ! म्हणजे, पुरतं फिरायचं नाहीं !

**सुमति :** पंडित, तूं असा चिडूंहि नकोस आणि भिऊंहि नकोस. कदाचित् मला वाटणाऱ्या भीतीनंच मी हीं भडक चित्रं रंगविलीं असतील. किती केलं तरी तूं पुरुष आहेस. तुला तुझ्या वडलांचा प्रचंड आधार आहे. सुलूची

गोष्ट तशी नाहीं. या एका क्षुल्लक गोष्टींतून लोकनिंदेचं भूत उठलं तर तिची काय अवस्था होईल याचा विचार कर. मुलांच्यापेक्षां मुलींनाच धाका जास्त. याच विचारानें मघां मी घाबरून गेलें होतें.

**पंडित** : ( चिडून ) आणि मला कांहींच धोका नाहीं? डीन्‌नीं मला कॉलेजांतूनच काढून टाकलं तर ?

**सुमति** : असं नाही होणार रे ! इतके कां लोक असमंजस असतात तुमच्या दोघांच्या हातून कांहींच अपराध घडलेला नाहीं. मग इतकं भ्यायचं काय कारण आहे? शिवाय, तुझे वडील काय स्वस्थ बसतील ?

**वसंत** : आक्का ! आज चौपाटीवरून परत येतांना पंडितच्या वडलांना मी भेटलों होतों ना? तेव्हां ते डीन्‌ला भेटायलाच निघाले होते.

**सुमति** : पाहिलंस? माझा अंदाज चुकायचा नाहीं. म्हणूनच मला वाटतं कीं यांतून कांहीं झालं तर खरा धोका आम्हांलाच आहे.

**पंडित** : ( चिडून ) हो तर ! तुम्ही मनाला येईल तसं करा ! दुसऱ्याच्या जीवनाची होळी पेटवून द्या अन् वर आपलेच हात भाजले म्हणून ओरडून सांगा !

**सुलभा** : ( मनस्वी चिडून ) पंडित, पुन्हां बोल बरं? कोणी कोणाच्या जीवनाची होळी पेटवली? दोन दिवस मला आश्रय दिलास त्याचा येवढा अनर्थ करतोस? तुझे उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं. तुझ्यावर जर कांहीं टपका आला तर मी जिवाचं रान करीन ! ( किंचित् थांबून ) आक्काचं तुझ्यावर प्रेम आहे, हें ज्या क्षणीं मला समजलं त्या क्षणापासून मी तुला वडील भावासारखं मानीत आलें आहे आणि त्याप्रमाणें वागत आलें आहे. मी हें तुझ्या वडलांना सांगेन, डीन्‌ला सांगेन, साऱ्या जगाला ओरडून सांगेन ! या संकटाची भीति घालून तूं खरी गोष्ट लपवूं पाहातोस ?

**पंडित** : काय लपवलं मी ?

**सुलभा** : बरं झालं कीं, मी तुझ्या खोलीवर राहिलें. मला माझ्या डोळ्यांनीं खऱ्या गोष्टी पाहायला तरी मिळाल्या. ती मुलगी काल तुझ्या खोलीवर आली तेव्हां कांहींतरी थाप मारून तूं मला दुसऱ्या खोलींत कां जायला लावलंस? तुझा माझा कांहीं संबंध नाहीं असं भासवण्याचा कां प्रयत्न केलास ?

**सुमति** : ( आश्चर्यानें ) कोण मुलगी ?

**सुलभा** : याचं जिच्याशीं लग्न ठरलं आहे ती ! ती इथं आली आहे अन् याला भेटायला म्हणून हॉस्टेल्मध्यें आली होती. ( पंडितला ) काय रे, दे ना माझ्या प्रश्नाचं उत्तर ? कां लपवलंस मला ?

**पंडित** : ( बावरून ) केवळ कांहीं गैरसमज व्हायला नको म्हणून.

**सुलभा** : अस्सं ! तिच्या गैरसमजाची तुला भीति वाटते तर ! मग आमच्याकडे येऊन बिचाऱ्या आक्काला कशाला फसवीत होतास ?

**पंडित** : ( रागानें ) काय फसवलं मी ? त्या मुलीशीं मला लग्न करायचं नाहीं हें माहीत आहे तुम्हांला.

**सुलभा** : तें आतां माहीत झालं. तुझे वडील आले तेव्हां ! त्यापूर्वीं तूं त्या मुलीबद्दल बोलला होतास कधीं ?

**पंडित** : काय आवश्यकता होती बोलण्याची ?

**सुलभा** : ( रागानें ) कां नव्हती ? ही प्रतारणा नव्हे ?

**पंडित** : वाटेल तें बोलून मला उगीच्च चिडवूं नकोस सुलभा !

**सुलभा** : आतां राग येतो आहे का तुला ? आणखी खोटेपणा सांगूं तुझा ?

**पंडित** : ( संतापानें ) सांग ना—

**सुलभा** : ( सुमतीकडे वळून ) आक्का ! आज सकाळीं हा आपल्या वडलांकडे गेला होता त्यावेळीं ती मुलगी पुन्हां आली होती. त्यावेळीं तिची-माझी भेट झाली. अगदीं रोड रोड आहे अन् चष्मा लावते...पण चांगली आहे तशी ! प्रथम जरा ती रागांत होती. पण मग नीट बोलली माझ्याशीं. तिचं-माझं खूप बोलणं झालं. मग तीच आपणहून डीन्‌कडे गेली ग ! हा परत आल्यावर ह्याचं-माझं खूप भांडण झालं ! मी तशीच हॉस्टेल्मधून जी ताडकन् बाहेर पडलें ती इकडे आलें. घरीं यायचा धीर झाला नाहीं म्हणून समुद्रावर गेलें—

**वसंत** : ( मध्येंच ) आणि मी तुला शोधून काढलं.

**सुलभा** : हो. अन् आक्का, तुला सांगायचं म्हणजे, पंडितचा आणि त्या मुलीचा पत्रव्यवहार चालू आहे. तिनंच सांगितलं मला.

**पंडित** : ( रागानें, ओरडून ) खोटी गोष्ट आहे ही ! मी अगदीं साधीं पत्रं लिहीत होतों—केवळ तिला वाईट वाटूं नये म्हणून ! माझा तसा उद्देश मुळींच नव्हता.

**सुमति** : ( शांतपणें ) पंडित, मला वाटतं तूं इथून जावंस हें बरं !

**सुलभा** : ( दचकून ) आक्का—

**पंडित** : सुमति, तूं माझं नीट ऐकून तर घे—

**सुमति** : जा बरं तूं. आणि पुन्हां इकडे कधीं न आलास तर तें सर्वांच्या हिताचं होईल. ( किंचित् कठोर आवाजानें ) जा म्हणून म्हणतेंय् ना मी ?

[ पंडित क्षणभर चरफडत उभा राहतो. मग रागाने स्टॅन्डवरची आपली हॅट उचलून तावातावाने निघून जातो. सुलभा स्तंभित होऊन आणि वसत ‘ आ ’ वासून पाहात उभे राहातात. ]

**सुलभा** : ( घाबरून ) आक्का ! काय केलंस हें !



# ४

[ एक दिवसानंतर. वेळ सकाळची आहे.

सुधीरला कडेवर उचलून शामराव सैपाकघरातून आंत येतात. सुधीरच्या कपाळावर आणि हनुवटीवर बँडेज आहे. ओठावरची सूज अजून पूर्ण ओसरलेली नाहीं. पण बाकी आजारीपणाचें काही चिन्ह नाहीं. शामरावच्या हातुन सुटण्याची सुधीरची धडपड चाललेली आहे. ]

**सुधीर** : ( लहान मुलाच्या त्रासिक रागानें ) सोड ना ! मला खेळायला जायचंय् !

**शामराव** : असं काय बरं सुधी ? आजच्या दिवस नकोस जाऊं. उद्यां जाऊं देईन. शहाणी नं सुधी आमची ?

**सुधीर** : नाहीं ! आत्तां जायचंय् !

**शामराव** : पण लागलंय् ना तुला ?

**सुधीर** : आतां नाहीं दुखत. ( बँडेज्‌ची पट्टी ओढून काढायला पाहातो. )

**शामराव** : ( घाबऱ्या घाबऱ्या पण प्रेमानें ) हां हां...असं नाहीं करायचं सुधी ! काल कसा शहाण्यासारखा निजून राहिला होतास ? तसा आजच्या दिवस रहा. तुला खूप खाऊ देईन.

**सुधीर** : खाऊ खाल्ला मी. आतां मला खेळायचंय्.

**शामराव** : अरे पण, पुन्हां जिन्यावरून पडलास म्हणजे ?

**सुधीर** : आतां नाहीं पडणार.

**शामराव** : आणि पडलास तर ?

**सुधीर** : ( मूठ वळून ) मारून काढीन जिन्याला !

[ शामरावांना खूप हासू येतें. त्या भरांत त्यांच्या हाताची पकड सैल होते. सुधीर चटकन खालीं उतरतो आणि जिन्याकडे धावतो. ]

**शामराव** : अरे, अरे ! ए सुधी—

[ पण सुधीर पळाला आहे. तेवढ्यांत वरून जिना उतरून वसंत येतो. तो वाटेंत असल्यानें त्याला एक गुद्दा मारून सुधीर दडदड जिना चढून जातो. ]

**वसंत** : ( आंत येत ) बाबा—

**शामराव** : ( त्याच्याकडे पाहून, हंसत ) आलास पुन्हां लांब चेहरा करून ! काय झालं ?

**वसंत** : घरांत समजलं आहे दागिन्याचं !

**शामराव** : ( बेफिकीरपणें ) मग ?

**वसंत** : शोधाशोध सुरू झाली आहे. ताईनीं घर डोक्यावर घेतलं आहे.

**शामराव** : ( तसेंच ) मग गंमत पाहा ! त्यांच्या डोक्यावरचं तुला पाठीवर घ्यायची कांहीं जरूर नाहीं.

**वसंत** : पण ताई उघडपणें माझं नांव घेते आहे.

**शामराव** : जाऊं दे रे ! तूं कशाला येवढा घाबरतो आहेस ?

**वसंत** : पण दागिने—

**शामराव** : आहेत मजजवळ सुरक्षित...आलमारींत.

**वसंत** : ( रडकुंडीला येत ) पण बाबा—

**शामराव** : ( किंचित् चिडून ) काय बावळट आहेस रे ? तुला सांगूनहि खरं वाटत नाहीं का ? दाखवतों तुला—

[ वेगाने उठून, किल्ल्या घेऊन आलमारी उघडतात व दागिने त्याला दाखवतात व लगेच आलमारी बंद करून घेतात. ]

झालं समाधान ?

**वसंत** : पण बाबा, मी नेऊन देतों ते, कांहीं भलतंच व्हायच्या आंत.

**शामराव** : असं काय करतोस, वसंत ? ( त्याच्याजवळ जाऊन समजावणीच्या स्वरांत ) तुला मी सांगितलं ना ? त्या जमनाचा कांहीं भरवंसा नाहीं. ती इथं पोलिसलासुद्धां घेऊन हजर व्हायची ! तिचं समाधान करण्यापुरते दोन दिवस राहूं दे. मग देतोंच आहे तुला परत. अगदीं शपथेवर सांगतों.

**वसंत** : पण बाबा—

**शामराव** : ( चिडून ) पुन्हां आहेच का तुझं ?

**वसंत** : ( ओशाळून, पण भीतीनें ) ताईसुद्धां पोलिस आणवील ! ( किंचित् थबकून ) म्हणून म्हणतों कीं एकदां त्यांना नेऊन देतों आणि मग तुम्हीं स्वतःच मागून आणा. म्हणजे कांहीं भानगड व्हायची नाहीं.

**शामराव** : वसंत, तूं शुद्ध गाढव आहेस ! हें इतकं सोपं असतं तर तुला दागिने आणायला लावायचा उपद्व्याप मी केला असता का ? आणि तूं दागिने नेऊन दिलेस म्हणजे तुझ्यावर चोरीचा आरोप आपोआपच सिद्ध होतो ! येवढं कळत नाहीं तुला ?

**वसंत** : ( रडकुंडीला येत ) मग मी काय करूं ?

**शामराव** : ( त्याच्या खांद्यावर दोन्ही हात ठेवीत ) तूं कांहीं करूं नकोस. माझ्यावर सोपवून दे आणि स्वस्थ रहा. तुझे माझ्यावर खरंच फार उपकार आहेत ! मी तुला संकटांत टाकीन असं तुला वाटतं ? येवढा एक प्रसंग होऊन जाऊं दे. सध्यां माझंहि मन स्थिर नाहीं. माणसावर संकटं आलीं म्हणजे चारी बाजूंनीं एकदम घेरा घालतात. मला जरा नीट विचार करायला सवड दे. या पेचांत माझ्यामुळें पडला आहेस तूं. त्यांतून सोडविण्याची जबाबदारी पण माझी आहे. विश्वास ठेव माझ्यावर.

**वसंत** : दागिन्यासंबंधीं विचारलं तर...( चाचरत ) तुमचं नांव —

**शामराव** : इतकी वेळ आली तर खुशाल सांग. जा आतां पाहूं !

[ वसंत नाखुशीनें जाऊं लागतो. तो दरवाजाच्या बाहेर गेल्यावर शामरावाच्या मनात कांहींतरी येतें. ते वेगाने जिन्याकडे जातात. ]

ए वसंत, थांब जरा.

[ दोघे जण दाराजवळ, बाहेर. क्षणभर उभे असलेले दिसतात. नंतर बोलत जिना चढून वर जातांना दिसतात.

क्षणभरानें खालचा जिना चढून जमना वर येते. उघड्या दारांतून ती आंत डोकावून पाहाते. कोणी नाहीं असें पाहून दाराचा बोलट जोरजोराने खडखडावते. तो आवाज ऐकून सुमति सैपाकघरातून बाहेर येते. ]

**जमना** : शामराव आहेत का नाहींत ?

**सुमति** : आतांच तर होते इथं ! शेजारी गेले असतील. कांहीं काम होतं ?

**जमना** : हो.

**सुमति** : मी बोलावून आणूं का त्यांना ?

**जमना** : हो.

[ जमना परवानगीची वाट न पाहाता आंत येते. मधल्या कोचाला वळसा घेऊन, पलीकडे उजव्या बाजूच्या खिडकीजवळ असलेल्या खुर्चीवर जाऊन बसते. ]

**सुमति** : कोचावर बसा ना.

**जमना** : नको. त्याच्यांतून उठता येत नाहीं लवकर.

**सुमति** : ( हासूं लपवीत ) मी बाबांना पाहातें.

**जमना** : जा तूं. बसलें आहे मी.

**सुमति** : तुम्हांला पाणी आणूं कां ?

**जमना** : नको. ( सुमति घुटमळते आहे हें पाहून ) घाबरूं नकोस. मी इथलं कांहीं घेऊन जाणार नाहीं.

[ सुमति ओशाळते व लगेच दाराजवळ जाऊन वरील जिन्याकडे पाहात ' वसत, ए वसता ' अशा हांका मारीत जिना चढू लागते. तेवढ्यात शामराव खालीं येताना दिसतात. सुमति जिन्याच्या शेवटच्या पायरीवर त्यांच्याशीं बोलते. ते तिला कांहीं सांगतात. सुमति आंत येऊन सैपाकघराच्या दारानें आंत निघून जाते. शामराव आंत येतात. बाजूला बसलेली जमना त्यांना एकदम दिसत नाहीं. दिसल्यावर ते क्षणमात्र दचकतात. ]

**शामराव** : जमना ! इकडे कशाला आलीस तूं ?

**जमना** : कशाला म्हणजे ? माझे दागिने न्यायला ! काढा दागिने माझे.

**शामराव** : अग पण हो ! मी आणून देणार होतों कीं ! येवढी तसदी घ्यायची काय जरूर होती ?

**जमना** : माझा नाहीं विश्वास. माझ्या राशीला लागून, छळून, दागिने काढायला लावलेत मला—

**शामराव** : पण जमना ! ती वेळच तशी होती. एका घटकेचा उशीर झाला असता तर कंपनींतली माझी नोकरी गेली असती. आणि वर बेअब्रू व्हायची ती झालीच असती !

**जमना** : दुसऱ्या दिवशीं रोकड रक्कम आणून देईपर्यंत सुद्धां तुम्हांला धीर नव्हता ! सैतानासारखी पाठ पकडली होती माझी !

**शामराव** : जमना, तुला माहीत आहे सगळं. मग कशाला पुन्हां त्या गोष्टी काढ-

तेस ? मी जर वेळेवर पैसे भरूं शकलों नसतों तर माझ्यावर केस झाली असती. माझ्या पोराबाळांच्या तोंडचं अन्न गेलं असतं.

**जमना :** म्हणून तर उरावर घातले दागिने तुमच्या !

**शामराव :** कांहीं कां म्हणेनास ! तुझे अगणित उपकार झालेत माझ्यावर.

**जमना :** उपकार गेले चुलीत ! दागिने माझ्या सुनेचे आहेत हें तुम्हांला ठाऊक आहे. चार दिवसांत परत करतों म्हणून माझ्या पायाशीं शपथ वाहिली होतीत. दागिने परत करायचं तर बाजूला राहिलं. पण तोंडसुद्धां दाखवलं नाहीत मला !

**शामराव :** जमना, किती संकटं अन् अडचणी माझ्यावर येऊन कोसळल्या गेल्या आठवड्यांत, याची तुला सांगूनसुद्धां कल्पना यायची नाहीं ! माझी धाकटी मुलगी घरांतून निघून गेली...तिचा शोध लावतां लावतां तोंडीं फेस आला माझ्या ! दोन घास पोटांत घालायलासुद्धां फुरसत मिळाली नाहीं...तर तुझ्याकडे कसा येऊं ?

**जमना :** तें मला सांगूं नका. तुमची मुलगी घरांतून गेली याचं मला कांहीं नवल वाटत नाहीं. तुमची करणीच तशी आहे. सैतानसुद्धां पळेल तुमच्यापासून दूर. मग माणसांची काय कथा ?

**शामराव :** ( हंसून ) जितक्या शिव्या द्यायच्या असतील तितक्या देऊन घे. सांपडलों आहे खरा तुझ्या हातीं !

**जमना :** दागिने द्या पाहूं माझे अगोदर. दागिने घेतल्याशिवाय मी हलणार नाहीं इथून. सांगून ठेवतें.

**शामराव :** अग पण, पैसे भरून ते सोडवून आणल्याशिवाय देणार तरी कसे ? येवढा तरी विचार करशील कीं नाहीं ?

**जमना :** ( न समजून, किंचित् घाबरटपणानें ) केलंत तरी काय दागिन्यांचं ?

**शामराव :** ( हंसत ) कांही केलं नाहीं. सुरक्षित आहेत अगदी. एका ठिकाणीं गहाण ठेवून पैसे काढले आणि—

**जमना :** गहाण टेवलेत ?

**शामराव :** मग तुझी काय कल्पना होती ? तसेच्या तसे दागिने नेऊन कंपनींत भरले ? तिथें तर रोख रक्कम भरायला हवी होती. म्हणून गहाणावर पैसे काढले.

**जमना :** ( चिडून ) चांडाळ ! माझ्या दागिन्यांचं वाटोळं करणार आहांत तुम्हीं ! तुम्हीं आतां पैसे भरणार आणि दागिने सोडवून आणणार ! (आवेगानें) तें कांहीं नाहीं...तुम्हीं काय वाटेल तें करा. स्वतःला विका, नाहींतर मुलींना विका ! मला या क्षणाला दागिने मिळालेच पाहिजेत.

**शामराव :** ( एकाएकी चिडून ) जमना ! काय बोलते आहेस तूं ? शरम नाहीं वाटत माझ्या मुलींचं नांव घ्यायला ?

**जमना :** ( किंचित् दबकून ) माझे दागिने घेऊन वर माझीच शरम—

**शामराव :** हो, हो ! तुला जर अशा हलकट गोष्टी बोलायच्या असतील तर मग माझ्यासारखा वाईट मनुष्य नाहीं. ( एकदम ) मी जर दागिन्याचं नाकबूल केलं तर काय करशील तूं ?

**जमना :** पोलिसांत जाऊन सांगेन.

**शामराव :** तूं मला दागिने दिलेस हें कसं सिद्ध करतां येईल ? लेखी पुरावा आहे ? साक्षी आहे ?

**जमना :** ( कल्पना येऊन, घाबरट अगतिकपणें ) मांग आहांत तुम्ही उलट्या काळजाचे !

**शामराव :** ( हंसत ) अस्सं ! अशी वळणावर ये जरा ! तूं माझ्या हातीं आहेस पूर्णपणें. माझं ऐकायचं नसेल तर बोंबलत बसावं लागेल. लक्षांत ठेव !

**जमना :** ( कळवळून ) कपटी ! विश्वासघातकी !

**शामराव :** ( कठोरपणें ) ओरडूं नकोस ! मी तुझा विश्वासघात केलेला नाहीं. अन् यापुढें तसं होऊं द्यायचं नसेल तर तुला माझ्यावर विश्वास ठेवला पाहिजे.

**जमना :** ( रडकुंडीला येत ) माझ्याकडून येवढे पैसे उकळलेत—

**शामराव :** ( हंसून, समजावणीच्या स्वरानें ) जमना, तुला काय कमी आहे ? येवढा धर्मादाय करतेस—

**जमना :** धर्म करणं आणि तुम्हाला देणं सारखंच वाटतं ?

**शामराव :** कां ? एखाद्या पोट सुटलेल्या लठ्ठ भटुरग्याच्या उरावर पैसा घालण्यापेक्षां माझ्या सारख्याच्या मुलांच्या पोटाला घातलंस तर दानधर्माचं पुण्य तरी लाभेल ! आणि हें पुण्य नको असलं तर बक्षिस दिले म्हणून समज.

**जमना :** तुम्हांला कशाचं बक्षीस द्यायचं ?

**शामराव** : ( हंसत, खंवचटपणें ) तें तूं आपल्या मनालाच विचार !

**जमना** : ( काकुळतीनें ) मी तुमच्या पायां पडतें. माझे दागिने परत द्या.

**शामराव** : ( सौम्यपणें ) जमना, दागिन्यांबद्दल मी तुला वचन देतों. पण गहाण सोडवून आणायला मला अवसर तर देशील ना ? चांगले माझ्या हातीं पैसे आले होते. पण माझ्या छोट्या मुलानं खेळतांना कागद समजून फाडून टाकला चेक. थोडीथोडकी रक्कम नाहीं. दोन हजारांचा चेक आहे ! ( आवेगानें टेबलाजवळ जातात व ड्रॉअर उघडून त्यांतून फाट-लेल्या चेकचे तुकडे काढून तिला दाखवितात. ) हें पाहा. आतां तरी पटली का खात्री ?

**जमना** : फाडलेल्या चेकचं मला कशाला सांगतां ? हे तुकडे दाखवून दुसरा चेक घेतां येईल.

**शामराव** : ( किंचित् गोंधळून ) हो...पण मला वेळ देशील कीं नाहीं ? या अशा सगळ्या अडचणी आल्या, म्हणून मला वेळेवर तुझे दागिने परत करतां आले नाहींत.

**जमना** : तुमच्यावर आतां माझा विश्वास बसणं फारच कठीण आहे !

**शामराव** : ( चिडून ) बायकांची जात म्हणजे...! थांब हं. (आलमारीकडे जात) कांहीं पैसे भरून मी थोडेसे दागिने सोडवून आणवले आहेत, ते दाखवतों तुला. म्हणजे तर खात्री पटेल ना ?

[ आलमारी उघडून त्यांतील दागिने काढतात. जमना त्यांच्याकडे आशाळभूत-पणानें पाहाते.

दागिने परत ठेवण्यासाठीं शामराव हंसत, बेफिकीरपणें आलमारीकडे तोंड वळवितात. जमना एकदम त्यांच्या हातावर झडप घालते. शामराव क्षणभरच बावरतात. दोघांची झटापट कांहीं क्षणच चालते. जमनाचा हात पिरगळून शामराव तिच्या हातांतले दागिने काढून घेतात. आलमारींत ते ठेवून धाडकन दार बंद करतात आणि आलमारीला पाठ लावून, ताणून उभे राहातात. ]

**शामराव** : हलकट साली !

**जमना** : ( दोन्ही डोळे घट्ट मिटून घेऊन, मार चुकविण्यासाठीं कानावर हात ठेवावे तसे ठेवीत, सगळें बळ एकत्र करून जोरानें किंचाळत ) धांवा हो धांवा ! धांवा हो—!

**शामराव** : ( मनांतून घाबरून, पण तिच्या अंगावर धांवून जात ) नीघ अगोदर इथून ! नाहींतर उचलून फेंकून देईन जिन्यावरनं !

[ जमना घाबरून पळू लागते आणि किंचाळत, ओरडत जिना उतरून जाते. पण तेवढ्यांत आवाज ऐकून सैपाकघरातून सुमति व सुलभा बाहेर येतात. त्यांनीं जमनाला पळत जातांना पाहिलें आहे. ]

**सुमति** : बाबा ! काय झालं ?

[ मुलींच्या एकदम येण्यानें शामराव दचकले आहेत. त्याच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें हें त्यांना सुचत नाहीं. ओठांची निष्फळ हालचाल करीत ते स्तंभित होऊन नुसतें त्यांच्याकडे पाहात उभे राहिले आहेत. मुलीहि तशाच अवस्थेंत उभ्या आहेत. कांहीं क्षण या विचित्र शांततेंत जातात.

मग परशुरामपंत धीम्या गतीनें प्रवेश करतात. त्यांच्या चेहऱ्यावर सूक्ष्म काळजीचें चिन्ह दिसत आहे. येरव्हीं त्यांच्या मुद्रेवरून किंवा शांत बोलण्यावरून कांहीं कळून येण्यासारखें नाहीं. ते येऊन कोचावर बसतात. त्या क्षणीं सगळे जणू भानावर येतात. सुमति व सुलभा आंत जाऊं लागतात व शामराव आलमारीपासून कोचाच्या दिशेनें येऊं लागतात.]

**परशुरामपंत** : मुलींनो, आंत जाण्याची आवश्यकता नाहीं. किंबहुना, तुम्ही इथं थांबलांत तर उपकार होतील. तुमची मदत मला हवी आहे. त्यासाठींच मी पुन्हां इथवर आलों आहे. गेल्या दोन तीन दिवसांतल्या सर्व घडामोडी मला माहीत आहेत. आणि पुष्कळ नवीन गोष्टीहि मला प्रथमच कळून आल्या आहेत. ( किंचित् थांबून ) शामराव, बसा ना आपण. (मुलींच्याकडे वळून ) तुम्हीहि बसा.

[ पण त्या दोघी तशाच भिंतीशीं उभ्या आहेत. ]

एक विशिष्ट हेतु मनांत धरून मी इथं आलों होतों. पण जें झालं तें वेगळंच. तरीहि हरकत नाहीं. ( थांबतात. )

**शामराव** : ( आशंकेनें ) पंडितचं काय झालं ?

**परशुरामपंत** : काय व्हायचं ?

**सुलभा** : ( एकदम भावनावेगानें परशुरामपंतांच्या जवळ जाऊन त्यांच्या पायांशीं बसत ) मी तुमची अतिशय अपराधी आहे ! मला क्षमा करा ! त्या भावनाकुल मनःस्थितींत पंडितकडे जाण्याशिवाय मला कांहीं दुसरं

सुचलं नाहीं. मी तुमच्या पायावर हात ठेवून, शपथ घेऊन सांगतें. पंडितशीं माझं वर्तन मोठ्या भावाशीं असावं तसंच आहे. दोन दिवस मी त्याच्याकडे राहिलें याचा कोणी कसाहि अर्थ करूं देत. तुम्ही विश्वास ठेवा माझ्यावर. आणि मला डीनकडे घेऊन चला. मी त्यांना ग्वाही देऊन सांगतें!

**परशुरामपंत** : ( शांतपणें ) सुलभा, उठ तूं. मला कल्पना आहे. तूं इतकं दुःखी व्हायचं कारण नाहीं. मी डीनला भेटून आलों आहे; तींहि समंजस माणसं आहेत. तरुणांच्या हातून नकळत चूक होऊं शकते याची त्यांनाहि जाणीव आहे.

**सुलभा** : ( उठत, उत्सुकतेनें ) हॉस्टेलमधून पंडितला काढून टाकणार नाहींत ना आतां?

**परशुरामपंत** : शिस्तीच्या दृष्टीनं कांहींतरी करणं त्यांना भाग आहे. आणि एका संस्थेचं नांव व मर्यादा सांभाळणं हेंहि आवश्यक आहे. पंडितकडून शिस्तीचं आणि नियमांचं उल्लंघन झालेलं आहे; आणि त्याची शिक्षा, संस्थेच्या हितासाठींहि त्यानं भोगली पाहिजे. परंतु त्याचबरोबर, संस्थेच्या हितासाठीं, झाल्या गोष्टींना विकृति प्राप्त होऊन त्याबद्दल नसता गवगवा होणार नाहीं, याची जबाबदारीहि चालकांच्या पुढें आहेच. पंडितला होस्टेलमध्यें ठेवणार नाहींत पुन्हां......पण, हें प्रकरणहि येवढ्यावरच आटोपेल.

**सुलभा** : (समाधानानें) म्हणजे, पंडितला कॉलेजमधून तरी काढून टाकीत नाहींत!

**परशुरामपंत** : नाहीं. पण डीननी मला एक अट घातली आहे.

**सुमति** : अट?

**परशुरामपंत** : अटच म्हणायला हरकत नाहीं. निदान, नैतिक दृष्ट्या मी तरी त्यांच्या सूचनेचा तसाच अर्थ करतों. पंडितनं अगोदर लग्न करावं आणि मग कॉलेजांत पाऊल टाकावं, अशी त्यांची इच्छा आहे. आणि तें बरोबर आहे, असं मलाहि वाटतं. पंडितसारख्या अस्थिर बुद्धीच्या मुलाला स्थिरता येण्यासाठीं लग्नाचं वजन आवश्यक आहे.

**सुमति** : मग फारच चांगलं. करून टाका त्याचं लग्न...त्या मुलीशीं ठरलेलं आहेच पहिल्यापासून !

**शामराव** : ( तिच्या स्वरानें दचकून ) आक्का—

**परशुरामपंत** : ( मध्येंच ) थांबा, शामराव. सुमतीच्या मनाच्या वेदना मी समजूं शकतों. मला प्रथम नीटशी कल्पना नव्हती. इथं आल्यावर आली... आणि आतां पंडितन परवांचा प्रसंग सविस्तर सांगितल्यानंतर माझी खात्री झाली. खरं प्रेम असल्याशिवाय मनाला यातना होणार नाहींत. बोल तूं सुमति.

**सुलभा** : पण ती मुलगी तर मजजवळ म्हणाली—

**परशुरामपंत** : तेंच खरं आहे, सुलभा ! मला प्रथम भीति वाटत होती कीं इथल्या गोष्टी कळल्यावर लीलाला—तिचं नांव लीला आहे—फार धक्का बसेल. म्हणून मी त्यादिवशी तुमच्याकडे अनाहूत आलों होतों. पण कित्येक वेळां वरवर वाईट दिसणाऱ्या गोष्टींतूनहि चांगलं उद्‌भवतं. ( एकदम ) तुझं तिचं काय बोलणं झालं, सुलभा ?

**सुलभा** : तिनं मला सर्व हकिगत सांगितली. मीहि आमची सर्व माहिती तिला इत्थंभूत वर्णन केली.

**परशुरामपंत** : त्याचा परिणाम चांगला झाला. ती सुविद्य आहे, समंजस आहे. तुमच्या बोलण्यामुळं सर्व गोष्टी स्पष्ट होऊन, तिच्या बाबतींत संभाव्य असणारा मानासिक अनर्थ टळला. तिला वेगळीच शंका आली होती... पंडितच्या नैतिक वर्तनाबद्दल ! त्याचा तिच्या मनाला मोठा धक्का बसला होता. त्यासरशीं ती इथं आली. प्रत्यक्ष पाहिल्यावर तिला समजलं कीं हा प्रश्न नीतीचा नसून प्रीतीचा आहे. मग ती स्वतःच डीनना भेटली आणि कांही गोष्टी तिनं त्यांना समजावून सांगितल्या. तिची स्वतःचीहि अशी खात्री झाली कीं पंडित हा तिच्या ध्येयाला योग्य असा जोडीदार नव्हे. पंडितशीं लग्न करायला तीच तयार नसल्यानं माझंहि बोलणं संपलं ! ( किंचित् थांबून ) ती मंडळी रात्रीच्या गाडीनं परत गेली.

**सुमति** : ( शांतपणें ) आणि आपण पंडितला नवी बायको शोधायला इथं आलांत !

**शामराव** : ( पुन्हां दचकून ) आक्का, कोणासमोर बोलतेस तूं !

**परशुरामपंत** : शामराव, तुम्ही स्वस्थ बसा. तिला बोलण्याचा पूर्ण

अधिकार आहे. आणि तिच्या बोलण्यानं माझा नकळत अपमान झाला तरी माझ्या मुलाच्या वागण्याबद्दल ती योग्य अशीच शिक्षा होईल. अपराध्याला शिक्षेचा इन्कार करण्याचा अधिकार नसतो. सुमति, तुझ्या प्रश्नाचं उत्तर असं. पंडितला बायको शोधायला आलों नाहीं मी. पंडितची बायको शोधून तिला घेऊन जायला आलों आहे! तिला मी इतके दिवस ओळखलं नव्हतं. माझं मन पूर्वीच्या स्नेहाच्या लाग्याबांध्यांत अडकून पडलं होतं. तें मुक्त झालं. म्हणून मी तिला आतां ओळखलं. आतां माझी खात्री झाली कीं तिनं पंडितच्या जीवनांत प्रवेश केला म्हणजे त्याचं मन बळकट होईल. त्याच्या परीक्षेच्या वाऱ्याहि संपतील...

**सुमति** : तुमच्या मुलाची परीक्षा पास व्हावी येवढ्यासाठींच मी तुम्हांला हवी आहे वाटतं? शेंकडों मुलं शेंकडों परीक्षा पास होतात. त्यांना स्फूर्ति द्यायला कांहीं मुली येत नाहींत. हा ज्याच्या त्याच्या कर्तृत्वाचा प्रश्न आहे!

**परशुरामपंत** : तुझा टोमणा योग्यच आहे. न्यायाच्या धारेवर चालतांना, पित्याच्या भावनेनें माझाहि तोल गेला आहे, हें मी कबूल करतों. पंडित माझा मुलगा आहे, एकुलता एक आहे. त्यामुळं माझ्यांतली न्यायदेवता त्याच्याकडे आंधळ्या डोळ्यांनीं पाहात आहे. याबद्दल माझा बचाव मी कांहींच करीत नाहीं. याच दुबळेपणानं वागून मी शामरावांना चेक दिला...जणूं तुम्हांला विकत घ्यायचा प्रयत्न केला! मी केलेल्या या तुमच्या अपमानाबद्दल मला शिक्षा सांगायची असली तर सांग.

**सुमति** : त्या चेकच्या चिंध्या झाल्या आहेत!

[ परशुरामपंत आश्चर्यानें सुमतीकडे व तिच्याकडून शामरावकडे पाहातात. शामराव उठून ड्रॉअरमधील फाडलेल्या चेकचे तुकडे त्यांच्या समोर आणून ठेवतात. ]

**परशुरामपंत** : शाबास सुमति! ह्या चेकच्या चिंध्या कोणी कां केल्या असेनात. पण यांत मला तुझ्या मनाचे स्फुल्लिंग दिसत आहेत! आतां मला एकच बचाव करण्याची परवानगी दे. माझा मुलगा म्हणून नव्हे! अपराध्यांचीं, गुन्हेगारांचीं मनं खोलपर्यंत निहाळून पाहाण्यांत माझी हयात गेली आहे, त्यावरून सांगतों. पंडित वाईट नाहीं, दुष्ट नाहीं; फक्त मनाचा कच्चा

आहे, भीरु आहे. तरूण वयांत मुलींच्या सहवासाचा लोभ सुटतो. ओळखी वाढत जातात. त्यावर भावनेचे थर बसतात. या सर्व गोष्टींनीं मन रमून जातें. परंतु यांपैकीं एकच भावना पकडून ठेवायची आणि बाकीच्यांना वेळींच, मर्यादेच्या आंतच, स्पष्टपणं आवरायचं हें कच्च्या मनाला साधत नाहीं. एकीकडे आकर्षण...आणि दुसरीकडे त्या त्या भावनांना दुखविण्याची भीति, या कैचींत हें मन सांपडतं. आणि त्यामुळं हे गैरसमज आणि घोटाळे निर्माण होतात. ( किंचित् थांबून ) आतां तरी पंडितच्या वागण्याचा अर्थ तुला कळेल कां ?

[ परशुरामपंतांच्या प्रश्नानें सर्वच जण चकित झाले आहेत. काहीं वेळ, काय बोलावे हेंच कोणाला समजत नाहीं. याच वेळीं जमना एका पोलिसाला घेऊन प्रवेश करते. ]

**जमना :** ( घाईघाईनें, शामरावकडे आणि मग आलमारीकडे बोट दाखवीत ) हे ते ! यांनीं घेतले माझे दागिने. त्या आलमारींत आहेत. कुलूपहि लावलेलं नाहीं. ( पोलिसला ) तुम्ही जा लवकर आणि द्या मला आणून ते. ( जवळजवळ पोलिसला लोटीतच ) जा, जा लवकर !

[ या अनपेक्षित प्रकारानें सर्वच जण स्तंभित होतात. शामराव ताडकन उडी मारून आलमारीजवळ धावत जातात. आणि आलमारीचा बचाव करण्याच्या पवित्र्यात उभे राहतात. ते अतिशय घाबरले आहेत, हें उघड दिसतें. परशुरामपंतहि उठून उभे राहिले आहेत. तेवढ्यात जमना किंचित् पुढें येते पोलिस तिच्या मागे आहे. इतर कोणी काहींहि बोलू शकत नाहीं. परशुरामपंतच पुढें होतात ]

**परशुरामपंत :** शामराव, या बाईचे दागिने तुम्ही घेतले आहेत ?

**शामराव :** ( चाचरत ) मी... मी —

**परशुरामपंत :** ( जरा अधिकारयुक्त वाणीनें ) घटना आणि प्रसंग यांचं वर्णन करण्याची जरूर नाहीं. मी तें ताडलं आहे. माझ्या प्रश्नांचीं उत्तरं द्या. घेतलेत तुम्ही दागिने ?

**शामराव :** हो.

**जमना :** ( पोलिसला ) पाहा, पाहा ! यांनीं कबूल केलं आहे. ( परशुरामपंतांना ) आणि तुम्हीहि साक्षी आहांत ! मागून खोटं बोलूं नका !

**परशुरामपंत :** ( तिच्याकडे दुर्लक्ष करून ) आतां आलमारींत आहेत ते दागिने ?

**शामराव :** नाहींत.

**जमना :** खोटं सांगताहेत ते. मला जाऊं द्या पुढं. मी काढून दाखवतें.

**परशुरामपंत :** कुठें आहेत मग ?

**शामराव :** गहाण ठेवले आहेत.

**परशुरामपंत :** सुरक्षित आहेत ?

**शामराव :** हो. पैसे भरून सोडवून आणायला मला अजून जमलं नाहीं. मी हिला सांगितलं होतं हें.

**परशुरामपंत :** ( पोलिसकडे वळून ) तुम्हांला थोडं तरी इंग्रजी येत असेल, नाहीं? (खिशांतून चट्दिशी कार्ड काढून) हें माझ्या नांवाचं कार्ड वाचा.मी न्यायाधीश आहे हें तुमच्या ध्यानीं येईल.(किंचित् थांबून) कायद्याच्या दृष्टीनं तुम्ही फार मोठी चूक करीत होता,याची कल्पना आहे कां तुम्हांला ? अधिकारपत्र असल्याशिवाय कोणाच्याहि घरांत शिरून झडती घेतां येत नाहीं हें तुम्ही जाणतां. या बाईनीं रीतसर फिर्याद नोंदवली आहे असंहि मला दिसत नाहीं. तिनं तुमच्या हातावर कांहीं पैसे ठेवून तुम्हांला इथं आणलेलं दिसतं आहे. या प्रकरणांत केस करायची तर प्रथम तुमच्यावर करावी लागेल. समजलं का माझं बोलणं ? तुम्ही जावं हें तुमच्या हिताचं आहे !

[ पोलिस अगोदरच बावरला आहे. त्याच स्थितींत तो सलाम करून पळ काढतो. ]

**जमना :** ( एकदम रडून ) माझे दागिने ! सगळ्यांनीं मेल्यांनीं कट केला आहे मला बुडविण्याचा ! तुम्ही येवढे न्यायाधीश...मग तुम्ही कसा हा अन्याय करतां !

**परशुरामपंत :** बाई, जरा दमानं घ्या. शामरावांनीं सगळं उघडपणें सांगितलं आहे. तुमच्या दागिन्यांची हमी मी घेतों.

**जमना :** माझा आतां कोणावर विश्वास राहिला नाहीं !

**परशुरामपंत :** शामराव, किती पैसे काढलेत तुम्ही दागिन्यावर ?

**शामराव :** पांच हजार.

**परशुरामपंत :** ( एकदम खिशांतून चेकबुक काढून चेक लिहून फाडतात व तो जमनाच्या हातीं देत ) बाई, हा पांच हजारांचा चेक. मी सही केली

आहे. वर तुमचं नांव घालून घ्या. उद्यां शामराव तुमच्याबरोबर येतील आणि दागिने सोडवून तुम्हांला देतील. तोंपर्यंत हा चेक जपून ठेवा तारण म्हणून.

[ जमना चेककडे निहाळून पाहात पुटपुटत निघून जाते. ती जातांच सुमतीला रडें आवरेनासें होतें. दोन्ही हातांनीं तोंड झाकून घेऊन ती रडूं लागते. सुलभाहि रडवा चेहरा करून तिच्या गळ्याभोंवतीं हात टाकते. ]

**शामराव** :आक्का ! माझं नीट ऐकून तर घे. ही बाई हलकट आहे ! तिचे दागिने मी घेतले, पण ते मी परत करणारच होतों. (परशुरामपंतांना) तुम्ही तरी माझं ऐका. कंपनीचे पैसे मी वापरले. एक स्वतंत्र व्यवहार करून पाहात होतों. जमला असता तर कदाचित् जन्माची ददाद मिटली असती. पण माझा प्रयत्न फसला. कंपनीच्या पैशाचा भरणा तीन-चार महिने मला करतां आला नाहीं...पैसेच नव्हते माझ्याजवळ. माझी नोकरी जायची वेळ आली. वर बेअब्रू ! माझ्या मुलांचं काय होणार या चिंतेनं मी बावरून गेलों ! त्याच मनःस्थितींत मी तीं पत्रं तुम्हांला लिहविलीं. मी काय करीत होतों, हें मला कळत नव्हतं. एकानं सांगितलं...मी...ऐकलं...हाच माझा अपराध ! त्यानं पत्रांत काय लिहिलं, किती पत्रं लिहिलीं, हें मी कधीं पाहिलंहि नाहीं ! या पत्रांचा अर्थ काय होईल, किंवा अनर्थ काय होईल, हें कळण्याइतकं माझं मन स्थिर नव्हतं. मला माझं संकट डोंगरायेवढं दिसत होतं... आणि मला तांतडीनं रकम हवी होती ! म्हणून मी ह्या जमनाकडून दागिने आणले व पैसे भरले. (किंचित् थांबून माझ्याजवळ रोकड जमली म्हणजे ते परत करणार होतों. दागिने मी कशाला ठेवूं ?

**परशुरामपंत** : (शांतपणें) तसं करणं सुरक्षितपणाचंहि नाहीं. तें स्त्रीधन आहे. त्याची ओळख पटवतां येते. रोकड रकमेची गोष्ट वेगळी !

**शामराव** : (वरमून) तुम्हांला वाटतं मी दागिने परत केले नसते ?

[ अचानकपणें विष्णुपंत तावातावानें प्रवेश करतात. त्यांच्या मागोमाग घाबरलेला वसंत आहे. ]

**विष्णुपंत** : (एकदम, तावातावानें) तुमचा भरंवसा कोणी धरावा ? भाड्याचे पैसे कधीं वेळेवर दिले नाहींत ! आतां तर काय घबाडच सांपडलं आहे ! काढा दागिने आमचे !

[ पुन्हा स्तंभित होण्याचा प्रसंग ! यावेळीं परशुरामपंतहि बुचकळ्यांत पडले आहेत. ]

**विष्णुपंत** : ( तावातावानें बोलत ) माझ्या घरांत चोरी केलीत तुम्ही ! फिर्याद करतों तुमच्यावर ! केस भरतों ! इतके दिवस तुमच्या मुलींच्याकडे पाहून गय केली. आतां हद्द झाली. आतां नाहीं सोडीत तुम्हांला जेल दाखविल्याशिवाय !

**वसंत** : ( एकदम पुढें होऊन, विष्णुपंतांना ) दादा, चोरी केली असली तर ती मी केली आहे. कुलूप उघडून डब्यांतले दागिने मी घेतले. बाबांनीं नाहीं घेतले. त्यांच्याजवळ मी ते ठेवायला दिले होतें नुसते.

**विष्णुपंत** : ( संतापानें ) शरम नाहीं वाटत इतक्या लोकांच्या समोर हें कबूल करायला ? तुलाहि तुरुंगाची हवा दाखविली पाहिजे. नालायक ! बेशरम कोणीकडचा ! आण ते दागिने अगोदर !

**वसंत** : ( शामरावांना ) बाबा, द्या ना.

[ शामराव मुकाट्यानें आलमारींतले दागिने काढून वसंताच्या हातीं देतात. तो ते विष्णुपंताच्या हातीं देतो. ]

**विष्णुपंत** : ( दागिने कबज्यांत घेऊन, खात्री करून ) पाजी कार्टा ! घरांतल्या घरांत चोऱ्या करायला शिकला आहे ! तुझी खोड मोडल्याशिवाय राहात नाहीं. ( जाऊं लागतात. )

**वसंत** : ( एकदम ) दादा, घरांतल्या घरांत चोरी होते ? हे दागिने माझ्या आईचे आहेत. ताईचा त्याच्यावर काय अधिकार आहे ?

**विष्णुपंत** : ( चिडून ) तोंड वर करून बोलतो आहेस ?

**वसंत** : बोलीन. आतां इथं सगळे आहेत. तुम्ही मला कांहीं करूं शकणार नाहीं ! माझ्या आईच्या दागिन्यांवर माझ्या बायकोचा हक्क आहे. मी आतां वयांत आलेलों आहे. तुम्हांला जर मला नीट वागवायचं नसलं तर माझा इष्टेटीचा वाटा मला देऊन टाका. आतांच्या आतां !

**विष्णुपंत** : इतक्या लोकांच्या समोर माझा पाणउतारा करतोस काय ? बेशरम—

[ त्याला मारण्यासाठीं हात उगारतात. वसंत घाबरून नकळत मुलभेच्या आश्रयाला उभा राहातो. परशुरामपंत मध्यें पडतात. ]

**परशुरामपंत** : ( शांतपणें ) आपण आतां जावं. तें जास्त योग्य आहे. आपल्या घरचीं भांडणं, खरीं असलीं तरी, तीं दुसऱ्याच्या घरीं भांडण्यांत सभ्यता राहात नाहीं. आपण माझं ऐकावं.

[ विष्णुपंत चडफडत निघून जातात. ]

**परशुरामपंत** : ( किंचित् थांबून ) या प्रकाराचा उलगडा मलाहि झाला नाहीं.

**शामराव** : ( वरमून ) ही जमना इथं येईल आणि कांहींतरी करील याची मला भीति होती. म्हणून तिला दाखविण्यापुरते दागिने घेऊन ये, असं मी वसंताला म्हटलं होतं.

**परशुरामपंत** : आणि त्यासाठीं त्याला चोरी करायला लावलीत ?

( शामराव कांहीं बोलत नाहीत. ]

**सुलभा** : ( भावनावेगानें, वसंताचा हात धरून, रडत ) वसंत ! वसंत ! तुझे कसे आभार मानूं मी ? कशाला तूं हें सारं केलंस ! बाबांच्यासाठीं— ?

**वसंत** : हो...! पण सुलभा, त्यांनीं मला वचन दिलं आहे कीं तुझं माझ्याशीं— ( लाजतो ).

**सुलभा** : भोळा आणि वेडा आहेस तूं वसंत !

**वसंत** : पण तूंसुद्धां म्हणाली होतीस ना ?

**सुलभा** : त्यांत सुधारणा करायला हवी, वसंत ! तुझ्या बावळटपणाची मी थट्टा केली याची क्षमा कर मला. तुझं आत्तांचं वर्तन पाहून माझी मलाच लाज वाटते आहे! मी कशा बापाची मुलगी आहे, हें माहीत असूनहि तूं माझा स्वीकार करशील ?

**वसंत** : ( आनंदानें ) हो...! अन् सुलभा, तूं जवळ असलीस म्हणजे दादांशींसुद्धां भांडतांना मला भीति वाटायची नाहीं !

[ सुलभेच्या डोळ्यांत पाणी तरारत आहे. त्याच स्थितींत तिला हासूं येतें. बहुतेक जण वसंताच्या शेवटच्या वाक्यानें हसतात ]

**परशुरामपंत** : शामराव, तुम्हांला थोडं बोलण्याचा मला अधिकार आहे. बोलूं ना ? ( किंचित् थांबून ) 'अर्थो हि कन्या परकीय एव' असं एक वचन आहे. त्याचा अर्थ असा कीं, कन्या ही दुसऱ्याचं धन आहे ! ती दुसऱ्याचं धन आहे असं समजून तिचा प्रतिपाल केला पाहिजे आणि योग्य वेळ आली म्हणजे ती कन्या, ठेवलेल्या ठेवीप्रमाणं, ज्याची त्याला अर्पण केली पाहिजे. पित्याच्या या कर्तव्याची दखल तुम्ही कधीं फारशी ठेवली नाहीं. आतां सर्व गोष्टींचा शेवट सुखांत झाला आहे हा केवळ योगायोग आहे. नाहींतर, तुमच्या या दोन्ही

सद्‌गुणी मुलींचं भवितव्य किती भेसूर होण्याचा संभव होता ! आणि याचं कारण म्हणजे एका चुकीला लपविण्यासाठीं तुम्ही चुकांचे डोंगर रचलेत...आणि तेंच आपलं सामर्थ्य मानून निढावत गेलांत ! गुन्हेगाराची अवस्था हीच होते. मघाच वाक्य थोडं फिरवून बोलूं कां ! परकीय धन ही सुद्धां कन्या आहे—कन्येसारखं आहे तें. परक्या धनाचा अभिलाष धरतां कामा नये, त्याचा अपहार करतां कामा नये. ही गोष्ट स्वकन्येच्या आभिलाषाइतकीच वाईट आहे ! जाऊं द्या. चांगलं झालं येवढ्यावरच समाधान मानूं या ! ( एकदम ) चल, सुमति !

**सुमति** : ( अश्रुपूर्ण मुखानें त्यांच्याकडे पाहात ) कुठें ?

**परशुरामपंत** : ( शांतपणें ) माझ्याबरोबर. मी पडितला कबूल केलं आहे कीं तुला घेऊन येतों.

**सुमति** : ( केविलवाणेपणानें ) मला आपल्याला एक विनंती करावयाची आहे.

**परशुरामपंत** : बोल.

**सुमति** : मला अफू आणून द्याल कां ?

**शामराव** : ( एकदम ) त्याऐवजीं मला दिलीत तर उपकार होतील !

**परशुरामपंत** : ( प्रथमच हंसून ) त्यापेक्षां चांगल्या गोष्टी जगांत आहेत.

[ सुधीर दुडदुड धावत येतो. तो सुमतीला जाऊन बिलगतो. तिच्याकडे पाहून क्षणभर बावरतो. पण मग नेहमींप्रमाणें भरभर बोलायला लागतो. ]

**सुधीर** : आक्का ! मी खूप खूप खेळलों...! असा ब्याटनं चेंडू मारला कीं समोरच्या घरावरच गेला ! (हंसतो) अन् आक्का ! पाहा आतां, पडलोंय् कां मी ?

[ सुमति त्याला उचलून घेते पण कांहींच बोलत नाहीं. ]

**परशुरामपंत** : हा सुधीर कां तुमचा ? ( त्याच्याजवळ जात ) सुधीर, चल. आपण सगळेच जेवायला जाऊं माझ्या हॉटेलांत. तिथं तुला खूप खाऊ देतों. काय आवडतं तुला ?

**सुधीर** : ( सुमतीला अधिकच बिलगत ) आक्का ! हा कोण ग !

**परशुरामपंत** : ( पुन्हां हंसून ) तुझ्या आक्काचा सासरा !

●●●